

# अर्पण पत्रिका



ओ–ना–मा–पासून नाट्यकलेचें शिक्षण देऊन

बरावाईट नाट्यलेखक

होण्यापर्यंतच्या सुस्थितीला मला आणिलें त्या

**'महाराष्ट्र नाटक मंडळी'स**

व तिच्या अभ्युदयाकरितां झटलेल्या आणि झटणाऱ्या

**सर्वत्रांस**

ही माझी प्रथम नाट्यकृति कृतज्ञतेनें

**अर्पण करीत आहे.**

–वि. ह. औंधकर





श्रीराम

# प्रस्तावना

महाराष्ट्र नाटक मंडळीला आपल्या एका प्रसिद्ध नटाची ही नाट्यकृति प्रयोगरूपानें जशी प्रेक्षकांसमोर मांडतांना, तशीच प्रस्तुत लेखकाला ती पुस्तकरूपानें वाचकांसमोर सादर करतांना धन्यता वाटावी यांत नवल नाहीं. महाराष्ट्र नाटक मंडळीच्या इतिहासांत अशा प्रकारचा हा दुसरा मंगल प्रसग होय. पूर्वी सन १९११ सालीं माझे त्यावेळचे सहकारी मित्र श्री० यशवंतराव टिपणीस यांचें 'कमला' नाटक मंडळीनीं रंगभूमी-वर आणलें, तो या प्रकारचा पहिला प्रसग. 'कमला' नाटकाला मंडळीच्चे आद्य पुरस्कर्ते गुरु० भानु यांनीं प्रस्तावना लिहिली आहे. आजच्या प्रसंगीं मीं तें कार्य करावें अशी श्री० औंधकर यांची इच्छा आहे. गुरुवर्यांची विद्वत्ता माझ्या अंगीं नाहीं. पण मंडळीच्या आप्तपणाचें जें माझें नातें आहे तें लक्षांत घेतां श्री० औंधकरांची इच्छा मला मोडवत नाहीं.

माझे तरुण मित्र श्री० विष्णुपंत औंधकर--प्रस्तुत नाटकाचे कर्ते--हे प्रथम सन १९०७ सालीं मंडळींत आले. मंडळीचें हें वर्ष संस्मरणीय आहे. पहिल्या दोन अडीच वर्षांच्या अनुभवानें गद्य नाटकासंबंधानें मंडळी जरा हताश झाली असतां गुरु० खाडिलकर यांचीं दोन नवीन नाटकें 'कीचकवध' व 'बायकांचें बंड' हीं याच वर्षी मंडळीला मिळालेलीं होतीं व त्या योगानें नवा हुरूप येऊन मंडळी आपला जम जोरानें बसवीत होती. याच सुमारास थोड्या फार अवकाशानें, निरनिराळ्या ठिकाणांहून जवळ जवळ सारख्याच म्हणजे चौदापंधरा वर्षांच्या वयाचीं चार अगदीं कोंवळीं मुलें मंडळींत आलीं. श्री० औंधकर हे त्यांपैकींच एक असून बाकीचीं तीन म्हणजे श्री० भट, वैशंपायन व दाते होत. त्यांना पाहून 'अरेरे! या कोवळ्या तरतरीत दिसणाऱ्या मुलांचें आयुष्य केवळ नाटक कंपनींत व्यर्थ जाणार ना? ज्या वयांत कांहींतरी विद्या संपादन करावयाची त्या वयांतच हीं नाटकी बनलीं! पुढें यांचें काय होणार तें दिसतेंच आहे!'

असे विचार मनांत येऊन त्या विचारांचा उच्चारही कित्येकांच्या तोंडून झाला असेल. पण आज जवळ जवळ दीड तपानंतरची वस्तुस्थिति पाहिली तर महाराष्ट्र मंडळींत या चारी कोंवळ्या मुलांचें आयुष्य वायांच गेलेलें दिसत आहे काय? त्यांच्याहून अधिक शिक्षणाच्या बऱ्याच लोकांपेक्षां ते खात्रीनें अधिक पैसा मिळवीत आहेत. चौघांचींही चांगल्या रीतीनें लग्नें झालीं असून ते सुखानं ससार करीत आहेत. आणि समाजांतलि चार लोकांचा शिष्टजनसंमत मार्ग न स्वीकारतां ते 'नाटकी' बनले यामुळें जर कांहीं त्यांच्या आयुष्याचें झालें असेल तर हेंच कीं, ज्या कलेला 'देवादिकांचा चाक्षुष यज्ञ' असें बहुमानानें म्हणतात त्या कलेंत या चौघांनींही आपापल्या परीनें यश मिळविलें असून चौघेही लोकादरास पात्र झालेले आहेत. त्यांचेपैकीं श्री० दाते हे तर 'नटा'चा श्रेष्ठ प्रतीचा लौकिक मिळवून शिवाय रा०दत्तोपंत देशपांडे यांचे जोडीला संस्था चालविण्याचें दुर्घट कार्यही करीत आहेत. आणि श्री० औंधकर हे नामांकित नट आज 'नाटककार' या बहुमानानें पुढे येत आहेत.

नट व नाटकार हा योग, अल्प प्रमाणांत कां होईना, पण महाराष्ट्रांत आरंभापासून दिसून येतो. महाराष्ट्र रंगभूमीचे जनक विष्णुदास भावे त्याचप्रमाणें अण्णासाहेब किर्लोस्कर, डोंगरे, देवल, माधवराव पाटणकर, श्री० यशवंतराव टिपणीस, काशिकर, गोविंदराव टेंबे वगैरे मंडळी नट व नाटककार म्हणूनच प्रसिद्ध आहेत. ही सर्व मंडळी पांढरपेशा वर्गातील असून थोड्याफार अंशानें व्युत्पन्न किंवा पूर्वी कांहींतरी शिक्षणाचे संस्कार झालेले अशांपैकीं आहेत. पण श्री० औंधकर हे एका मागसलेल्या शिंपी जातींतलि असून यांचें पूर्वशिक्षण पाहिलें तर गांवठी शाळेंत व्यापारी लेखनवाचन व हिशेबठिशेब या पलीकडे बिलकुल झालेलें नाहीं. आणि वर सांगितल्याप्रमाणें ते अगदीं कोंवळ्या वयांतच नाटक कंपनींत आलेले! पण यांची प्रस्तुतची ही पहिलीच नाट्यकृति पाहिली तर महाराष्ट्रांतील चांगल्या नाटककारांच्या पंक्तीला —वरच्या पानावर जरी नव्हे तरी कोठें तरी पंक्तीला—बसण्याइतक्या योग्यतेची ती झाली आहे असें रसिकांना वाटल्यावांचून रहाणार नाहीं असें वाटतें.

वरील गोष्टी प्रामुख्यानें येथें मांडण्याचा हेतु इतकाच कीं, सामान्यतः नाटकाच्या धंद्यासंबंधानें बहुजनसमाजाचा जो एक ग्रह आहे तो सर्वांशीं

खराच आहे असें नसून या धंद्यांतही कोणाला कसा वाव आहे, आपल्या कर्तबगारीनें कोणालाही या धंद्यांत कशा प्रकारचें यश मिळवितां येते, संभावितपणानें राहून कोणालाही संसार चांगला करतां येतो, इतकेंच नव्हे तर समाजांत प्रतिष्ठित समजलेल्या इतर व्यवसायांत शेंकडा नव्याण्णव सु-शिक्षितांनाही कर्तबगारी दाखविण्याला जो अवसर नसतो तो या धंद्यांत अशिक्षितांनाही मिळून येथील व्यावहारिक शिक्षणानें विद्वज्जनमान्य असें यशही या धंद्यांत मिळविणें शक्य कसें असतें, हें या धंद्याच्या चालू काळांतील, लोकांच्या नजरेसमोरच्या, प्रत्यक्ष गोष्टी निदर्शनास आणून समाजाचा या धंद्यासंबंधाचा ग्रह थोड्याफार अंशानें बदलतां आला तर पहावा; तसेंच नाटकाच्या धंद्यांत पडलेल्या इतर होतकरू तरुणांच्या मनांतही कर्तबगारीसंबंधानें सात्त्विक ईर्षा उत्पन्न व्हावी हाही एक, या गोष्टी अशा रीतीनें पुढें मांडण्याचा दुसरा हेतु आहे. श्री० औंधकर यांची जन्मजात परिस्थिति व त्यांचें पूर्व शिक्षण हीं सर्वथैव मागासलेलीं असतांही नाटकाच्या धंद्यांत राहून त्या धंद्यांतील व्यावहारिक शिक्षणाचा जागृत मनानें फायदा घेऊन आपल्या परिश्रमानें त्यांना काय करतां आलें हा इतिहास कोणाही तरुण नटाला बोधप्रद होऊन उमेद आणणारा आहे. नटांना इतर धंद्याच्या मानानें पोटाकरितां श्रम व दगदग कमी पडत असते. फुर-सतीचा वेळ व मनाची स्वस्थता हीं निःसशय अधिक असते. या अनुकूल-तेचा फायदा श्री० औंधकरांना जसा घेतां आला तसाच तो इतरांनाही घेतां येण्यासारखा आहे. श्री० औंधकरांप्रमाणें सर्वांनाच नाटककार होतां होईल किंवा सर्वांनीं नाटककारच व्हावें असा या लिहिण्याचा हेतु नाहीं. पण नाट्यकलेंत 'लोकवृत्तानुकरण' करून अखिल संसाराचें चित्र दाखवा-वयाचें असल्याकारणानें त्या कलेंत अंतर्भूत होत नाहीं अशी कोणतीच विद्या अगर कला नाहीं. मग यांपैकीं साधेल त्या एकाद्या विद्येंत अगर कलेंत श्री० औंधकरांप्रमाणें वरील अनुकूलतेचा योग्य उपयोग करून घेऊन तपश्चर्येनें कोणत्याही नटाला यश मिळवितां येणार नाहीं काय? या धंद्यांतील माझ्या तरुण होतकरू मित्रांनीं या कळकळीच्या चार शब्दांचा अव्हेर करूं नये अशी माझी त्यांस विनंती आहे.

श्री० औंधकरांचें हें 'बेबंदशाही' नाटक, त्यांची पहिली कृति म्हणून

लोकांपुढें येत आहे. यापूर्वी वेगवेगळ्या कथानकावर एक दोन अपुरे प्रयत्न करून त्यांनीं पाहिले होते. पण ते केवळ हात वळण्यासाठींच होते. सन १९१४ सालचे सुमारास 'कंसवधा'च्या कथानकावर लिहिलेले दोनतीन प्रवेश मला त्यांनीं दाखविले होते. त्यावरून हल्लींच्या इतके हे नाटककार होतील असें निदान त्यावेळीं तरी मला वाटलें नव्हतें. लेखनाचा अंकुर खास होता, पण त्याच्या विकासाचा अंदाज मात्र करवत नव्हता. तरीपण 'मीं नाटक लिहावें आणि महाराष्ट्र नाटक मंडळीकडून तें पुढें यावें' अशी आपली फार फार इच्छा असल्याचें त्यांनीं त्यावेळीं बोलून दाखविलें व त्या इच्छेला देतां येईल तितकें प्रोत्साहन त्यावेळीं दिलें गेलें. त्या प्रोत्साहनाप्रमाणें आज खरोखरच गोष्टी घडून आलेल्या पाहून श्री० औंधकरां-प्रमाणेंच प्रस्तुत प्रस्तावनालेखकालाही परमावधीचा संतोष वाटत आहे.

'बेबदशाही'चें कथानक ऐतिहासिक आहे. याच ऐतिहासिक भागावर पूर्वीं तीन चार तरी नाटकें होऊन गेलेलीं असून त्यांतच नुकतेच होऊन गेलेले प्रतिभासंपन्न नाटककार कै० गडकरी यांचें 'राजसंन्यास' हें एक आहे. तें अपुरें असलें तरी गोविंदाग्रजांच्या अखंड दरवळणाऱ्या बागेंतील तें अर्धो-न्मीलित असें पुष्प आहे. तें अशा स्थितींतही टवटवीत राहून आपला आल्हादकारक परिमळ निरंतर सोडल्यावांचून रहाणार नाहीं. असें असूनही त्यांच्या मागून श्री० औंधकरांनीं त्याच भागावर आपलें हें पहिलेंच नाटक लिहिण्याचें धाडस कां करावें ? खरें म्हटलें तर 'राजसंन्यास' नाटक वाचूनच त्यांना हें नाटक लिहावेंसें वाटलें. याचें कारण एक तर कै० गडकऱ्यांचें नाटक अपुरें राहिल्यानें तो ऐतिहासिक भागच पुऱ्या स्वरूपांत चांगल्या रीतीनें लोकांपुढें येण्याचें राहून गेलें. शिवाय कै० गडकऱ्यांचा तें नाटक लिहिण्यांत भाषेच्या दृष्टीनें जो एक विशेष हेतु होता—म्हणजे विशिष्ट काळाचें चित्र तत्कालिन पात्रांच्या व प्रसंगांच्याद्वारें जसें दाखवावयाचें तसेंच तें त्या काळाच्या भाषेच्या द्वारेंही दाखवावयाचें—हा त्यांचा हेतुही अपुराच राहून गेला. या दोन्ही दृष्टींनीं थोडाफार साधल्यास आपण प्रयत्न करून पहावा ही उमेद श्री० औंधकरांनीं मनांत धरली. तसेंच कै० गडकऱ्यांनीं आपल्या कथानकांत ऐतिहासिक प्रसंगांवर फारसा भर दिलेला नसून संभाजी, येसूबाई, शाहुराजे व कलुषा या पात्रांवांचून बाकीचीं त्यांचीं

पात्रेंही काल्पनिक आहेत. तानाजीचा राया व हिरोजी फर्जंद हीं पात्रें नांवानें ऐतिहासिक आहेत; पण त्यांची रंगावट पाहिली तर त्यांचे जागीं काल्पनिक नांवें घेतलीं असतांही चालण्यासारखें आहे. तेव्हां आपण आपल्या कथानकांत होतांहोईल तों ऐतिहासिक पात्रेंच घ्यावीं व संभवनीय वाटतील असे त्यांचे ऐतिहासिक प्रसंग योजून आपण नाट्यरचना करावी असें श्री० औंधकरांनीं ठरविलें. ही त्यांची मनीषा अगदीं हातास न येणाऱ्या दुष्प्राप्य फळासाठीं खुजा वामनानें धरलेल्या लोभासारखीच होती, त्यांत त्यांना यश आलेंच नाहीं असें त्यांची ही प्रस्तुतची कृति वाचल्यावर अगर तिचा प्रयोग पाहिल्यावर कोणाही सहृदय वाचकाला अगर प्रेक्षकाला म्हणतां येईल असें वाटत नाहीं.

एखाद्या ऐतिहासिक कथाभागाची यथाक्रम अंकांत आणि प्रवेशांत-वांटणी करून तत्कालीन पात्रांच्या द्वारें तो कथाभाग वठवून दाखविला, कीं तें जसें ऐतिहासिक नाटक झालें असें म्हणतां येणार नाहीं; फार तर त्यास 'बखरीचा चित्रपट' म्हणतां येईल, त्याचप्रमाणें लेखकाच्या मनांतील एखादें विशिष्ट तत्त्व प्रतिपादन करण्यासाठीं अगर एखादा काल्पनिक प्रसंग वठविण्यासाठीं एखादें कथानक योजून त्यांतील पात्रांना ऐतिहासिक नांवें दिलीं तर त्यालाही 'खरें ऐतिहासिक नाटक' असें म्हणतां येणार नाहीं. ऐतिहासिक गोष्टी या गतकाळीं सृष्टींत घडलेल्या प्रत्यक्ष गोष्टी होत. आणि सृष्टींत प्रत्यक्ष घडणारे कोणतेही बाह्य व्यापार हे त्या त्या काळीं अदृश्य रूपानें वावरणाऱ्या पण देशकालवर्तमानानुसार विशिष्ट अशा कोणत्या तरी गूढ शक्तीच्या योगानें चाललेले असतात. कोणत्याही एखाद्या ऐतिहासिक अशा ठळक कालखंडांत घडलेल्या अनेक गोष्टी किंवा प्रसंग हे बाह्यतः परस्परविरोधी किंवा अगदीं तुटक असे वाटत असले तरी सूत्रचालकाप्रमाणें अदृश्य राहून आपले व्यापार चालविणाऱ्या त्या कालखंडांतील गूढ शक्तीचा जर बोध झाला तर सकृद्दर्शनीं विरोधी अगर तुटक वाटणाऱ्या गोष्टींत व प्रसंगांत कार्यकारणभावाचा लागाबांधा कोणत्या प्रकारचा आहे यावर लःकन् प्रकाश पडल्यासारखें होऊन ऐतिहासिक कालाचें तें चित्र मनःश्चक्षूंपुढें सायसंगीत उभें रहातें व मानवी मनाला कोड्याचा उलगडा झाल्याप्रमाणें आल्हाददायक होऊन बोधप्रदही होतें

ऐतिहासिक नाटक लिहिणारानें त्या काळीं घडलेल्या सर्व गोष्टींना सूत्रानें खेळविणारी ऐतिहासिक गूढ शक्ति बरोबर ओळखून तिच्या साक्षीनें त्या सर्व गोष्टींची मांडणी चतुराईनें-खऱ्या नाट्यकवीच्या कुशलतेनें-केली तरच तें नाटक खरें ऐतिहासिक नाटक या नांवाला पात्र होईल. अशा प्रकारचीं नांवें घेण्यासारखीं मराठी भाषेंतील ऐतिहासिक नाटकें म्हणजे गुरु०खाडिलकर यांचीं 'भाऊबंदकी' व 'सवाई माधवरावाचा मृत्यु' त्याचप्रमाणें श्री० तात्यासाहेब केळकर यांचें 'तोतयाचें बंड' आणि कै० शास्त्रीबुवा यांचें 'शिवसंभव' हींच होत. कै०गडकरी यांचें 'राजसंन्यास' हें नाटक, नाटक या दृष्टीनें अत्यंत श्रेष्ठ दर्जाचें आहे. पण तें ऐतिहासिक नाटक नसून तत्त्वप्रतिपादक आहे. म्हणजे कै० गडकऱ्यांच्या मनांतील एक तत्त्व- अर्थात् तें त्रिकालाबाधित आहे-कीं 'राजा हा जगताचा इच्छाविरहित-उपभोगशून्य स्वामी' तो उपभोगरत झाला तर 'परिस्थितजनांची पुण्याई रद्द होते', राज्य रसातळाला जातें, हें तत्त्व विशद करून दाखविण्यासाठीं त्यांनीं संभाजीचें चरित्र दृष्टांतादाखल घेऊन आपलें नाटक रचिलें आहे. व त्या दृष्टीनें तें तत्त्वप्रतिपादक नाटक म्हणून अत्यंत सरस वठलें आहे. पण त्या काळच्या ऐतिहासिक गूढ शक्तीचा ओघ जर पाहिला तर संभाजीच्या दुष्कृत्यांनीं किंवा कै० गडकरी म्हणतात त्याप्रमाणें संभाजीला 'नेत्या पुरुषाची जबाबदारी न कळल्यामुळे मराठेशाही मातीस मिळाली', हें खरें नसून त्या दुष्कृत्यांनीं बेबंदशाही कळसास पोचून, मराठेशाहींत खऱ्या देशाभिमानाची प्रेरणा होऊन पुढें मराठेशाहीची हिंदुपदपादशाही झालेली आहे. या दृष्टीनें पाहिलें असतां श्री० औंधकरांचें 'बेबंदशाही' हें नाटक 'ऐतिहासिक नाटक' या नांवाला अधिक साजेसें झालें आहे. 'बेबंदशाही' हें नाटकाचें नांव त्या काळाचें बाह्यस्वरूप दर्शवीत असून त्या स्वरूपाचीं सूत्रें हालविणाऱ्या त्या काळच्या गूढ शक्तीचा ओघ नाटकाच्या एकंदर कथानकांतून अशा रीतीनें गेलेला दाखविला आहे कीं, 'माझ्या सुटकेकडे आशाळभूतपणानें डोळे लावून बसलेली मराठेशाही तुला (औरंगजेबाला) याच दक्षिणेंत त्राहि त्राहि करून सोडल्याशिवाय राहणार नाहीं....मराठ्यांच्या बेबंदशाहीला कारण झालेला हा राजा स्वधर्मासाठीं प्राणांची आहुति देऊन हिंदुपदपादशाहींत एकीचा नवा जोम निर्माण केल्यावांचून रहात नाहीं'. हे संभाजीच्या तोंडचे त्या

ओघाची ऐतिहासिक गति व दिशा दाखविणारे शब्द कोणालाही पटल्यावांचून राहाणार नाहींत.

प्रस्तुत नाटकाच्या कथेची संविधानकांत मांडणी—अर्थात् त्यांतील रचनाकौशल्य, रसोत्पत्ति व रसोत्कर्ष, पात्रांचे स्वभावपरिपोष, विचार, कल्पना व काव्य इत्यादि गोष्टींबद्दल मी येथें कांहीं लिहिण्यापेक्षां परिचयादाखल वर लिहिलेल्या सर्वसामान्य प्रस्तावानें प्रत्यक्ष नाटकच रसिकांपुढें, त्याचा हंसक्षीरन्यायानें आस्वाद घेण्यासाठीं, सादर करणें मला बरें वाटतें. फक्त तत्कालीन भाषेची छाया नाटकांत आणण्यासंबंधानें जो श्री० औंधकर यांनीं प्रयत्न केला आहे त्याचा येथें निर्देश करणें अवश्य आहे. या प्रयत्नाचा उपक्रम प्रथम कै०गडकरी यांनीं आपल्या 'राजसंन्यासां'त केल्याचें वर सांगितलेंच आहे. नाटकांतील भाषेचा प्रश्न हा एक साहित्यशास्त्रांतील 'संकेता'चा भाग आहे. नाटकाच्या कथाभागाचा देशकाल हीं जरी वेगळीं असलीं तरी ज्या देशच्या व ज्या काळच्या प्रेक्षकांसाठीं तें लिहिलें असेल त्यांच्या काळच्या भाषेचीच त्या नाटकांत योजना करणें प्राप्त आहे. हा सामान्य संकेत स्वीकारून मग ज्या ज्या साधनांनीं किंवा नजरबंदीनें त्या कथानकाच्या कालाची छाया नाटकांत आणतां येईल त्यांनीं त्यानीं ती अवश्य आणावी. कै०गडकरी यांनीं बखरींचा व तत्कालीन पत्रव्यवहाराचा चांगला अभ्यास करून आपल्या कल्पना त्या काळच्या भाषणसांप्रदायांनीं सुंदर रीतीनें नटवून ती छाया निःसंशय आणली आहे. कै० गडकरी यांच्या प्रतिभेचा भाग सोडून दिला तर श्री० औंधकर यांनींही त्या दृष्टीनें प्रस्तुत नाटकांत कौतुक वाटण्यासारखें यश संपादन केलें आहे असें दिसून येईल.

या नाटकांतील विनोद कांहींसा हलक्या दर्जाचा वाटण्याचा संभव आहे. पण बदफैली, विषयासक्त संभाजीच्या राजवटींतील तें दृश्य आहे इतकें लक्षांत घेतलें असतां त्याचा हलकेपणा क्षम्य होईल असें वाटतें. एकंदरीनें श्री० औंधकर यांच्या या पहिल्या नाट्यकृतींत दिसून येणारे ठळक गुण म्हणजे घेतलेल्या ऐतिहासिक काळाचें मर्म ओळखून तदनुसार कथानकाची रचना करण्याचें चातुर्य, अनुकूल असे वेचक उठावदार प्रसंग योजून ते सफाईदार रीतीनें रंगविण्याची हातोटी, निकराचे संवाद मोजक्या शब्दांनीं जोरदार भाषेंत घालण्याचें कसब, मनाच्या अवस्था व त्यांचे

पालट यांची मीमांसा करण्याची कुशलता हे गुण सतत परिश्रमानें विकास पावत गेले तर श्री० औंधकर हे पुढें मागें चांगल्या प्रकारचे नाटककार होतील यांत शंका नाहीं.

श्री० औंधकर हे प्रथम महाराष्ट्र मंडळींत आले त्यावेळीं त्यांजकडे 'फाल्गुनराव' नाटकांतील प्रथमच भिक्षेसाठीं येणाऱ्या रामदासीबुवा बरोबरील 'काळ्याबाई'ची भूमिका दिली होती. दारांतील भिकारीण कालांतराने पुढें सिंहासनावरील राणी झाली व 'काळ्याबाई'च्या झोळींत आज या नाटकाच्या गोऱ्या यशाची भिक्षा रसिक खास घातल्यावांचून राहणार नाहींत. हें दृश्य पाहून प्रस्तुत लेखकाला एकप्रकारें धन्य वाटत आहे. महाराष्ट्र नाटक मंडळींतील नटांचीं अशीं दृश्यें अधिकाधिक पहावयास सांपडोत !

पुणें, ता. २० ऑगस्ट १९२४<br>श्रावण वद्य ६ शके १८४६. } **त्र्यंबक सीताराम कारखानीस.**

## चार शब्द

गुरु० अण्णासाहेब कारखानीस यांनीं माझ्या या प्रथम कृतीस प्रोत्साहनपूर्ण प्रस्तावना लिहून मला अत्यंत ऋणि केलें आहे. त्याचप्रमाणें हें नाटक लिहिण्याचे बाबतींत ज्या माझ्या मित्रांनीं मला विविध प्रकारचें साहाय्य केलें त्याबद्दल त्यांचा, महाराष्ट्र नाटक मंडळीनें हें नाटक परिश्रमपूर्वक बसवून अत्यंत मनोहर सजावटीनें रंगभूमीवर आणलें म्हणून त्यांचा, त्याचप्रमाणें अत्यंत आस्थेनें प्रस्तुत पुस्तक छापून दिलें याबद्दल 'विजय प्रेस'चे मालक रा० **आप्पासाहेब गोखले** यांचा मी अंतःकरणपूर्वक आभारी आहे.

आपला

**वि. ह. औंधकर**

श्रीराम

# बेबंदशाही

## अंक पहिला

### प्रवेश पहिला

[ ताराऊ आणि सूर्याजी किल्लेदार बोलत बसले आहेत.
स्थळ—रायगडावरील एक निवांत जागा.]

ताराऊः—सूर्याजीराव, ह्या ताराऊला छत्रपति भोंसल्यासारख्या थोर कुळांत स्थळ मिळालें म्हणून माझ्या माहेरच्या माणसांनीं मला भाग्यवंतीण म्हणावें ! सख्या सोबतिणींनीं, खेळीमेळी मैत्रिणींनीं 'आतां काय बाई, ताराऊ नरेंद्राची राणी–कुबेराची कामिनी बनली आहे' अशा थट्टेनें मला पुरे पुरे करावें ! दख्खन–दौलतीच्या अपरंपार कल्पनेनें मीं सुद्धां मनामध्यें धन्यता मानावी ! पण काळाच्या पोटांत पुनः कैदखान्यासारखें विपरीत भविष्य भरलें असेल हें त्यावेळीं कुणाच्या स्वप्नींही आलें नाहीं. आतां कुबेरकुळीचें नांव सांगावें आणि कंगालगतीनें जगावें, असलें खडतर लिखितच सटीनें भाळीं लिहिलें असलें पाहिजे. नाहीं तर घातल्या अन्नावर आणि दिल्या वस्त्रावर लाजिरवाणें जिणें जगण्यांत, नजरकैदेच्या ह्या

कोंडवाड्यांत चोराचटोराप्रमाणें कोंडून घेण्यांत, स्वारींना खंती नसती का वाटली ? होणारासारखी बुद्धि होते म्हणतात तेंच खरें.

सूर्याजीः—(स्वगत) झाली या बयेची कटकट सुरू! (उघड) वहिनीसरकार, ओढवल्या संकटाची राजाराममहाराजांना खंती वाटल्याविना कशी राहील ? पण त्यांनीं करावें काय ? बघावें तिकडे निराशेचीं स्मशानें आणि दुःखाचा दर्या तुफान भडकून गेलेला ! मग ते हताश दिसले तर त्यांत नवल काय ? बुरा वक्त आला म्हणजे अक्कलवंतांनाही चक्कर खावी लागते सरकार!

ताराऊः—पिसाळ, दुर्दैवाचे गोते धन्वंतऱ्यांनाही चुकत नाहींत हें मला समजतें, पण त्या गोत्यांना नुसता गुंगारा देण्याचाही प्रयत्न न करणें म्हणजे खाऊं पाहणाऱ्या जातीच्या वाघापुढें गरीब गाईनें आपसूक मान देण्यासारखेंच नाहीं का ? आल्या संकटाची आज नऊ वर्षे गांजणूक गांजते! किती दिवस भावाची दरकार ठेवायची ? येऊं नये तो बुरा वक्त आला खरा! आतां वाघ म्हटलें तरी मोत आहे, आणि वाघोबा म्हटल्यानेंही मरण टळत नाहीं. मग ओढवलें मरण टाळण्यासाठीं अंमळ हातपाय तरी पाखडायला नकोत का?

सूर्याजीः—सरकार, बोलल्या गोष्टींतलें इंगित उमगलों. मानी आणि महत्त्वाकांक्षी मराठ्यांना शोभेसें वहिनीसरकार बोलल्या! (स्वगत) शिर्क्यांनीं मोगलांचे मदतीनें भोंसल्यांचा निर्वंश करण्याचा विडा उचलून माझी मोहबत केल्यावर या बयेच्या महत्त्वाकांक्षेला कुठून वाव मिळणार! (उघड) पण सरकार, शंभुराजांच्या—ह्या धाडशी कर्दनकाळाच्या—बेबंदशाहींत अशा मसलतीला माणूस आतां धजावेल कसें ? आमचेच घ्याना, वांईच्या देशमुखीसाठीं तळमळतां जीव मुठींत धरून बसायची आम्हांला तरी हौस का आहे ? पण करावें कसें ? आबासाहेबांच्या मरणकाळीं शंभुराजांना पन्हाळ्यावर कैदेंत ठेवून, भल्याभलाईत गाजलेल्या मुत्सद्यांनीं राजाराममहाराजांना तक्तनशीन केलें, पण घडल्या कारस्थानाची खबर वायुवेगानें शंभुराजांच्या कानीं जाऊन, पहिल्याच बेफाम धडाडीनें त्यांनीं अवघी दरखन जरबबंद केली. कारस्थानी मातबरांना सरसहा कत्तलीनें न्यायनिवाडा दिला. सोयराबाईसारखी दौलतीची धनीण—महाराष्ट्राची प्रत्यक्ष राणी—पण भिंतींत

चिणून हालहाल करून मारली गेली! तसेंच, औरंगजेबाचा बडा छोकरा शहाजादा अकबर, बापाच्या सुडाखातर मराठ्यांच्या मदतमागीस आला होता, त्याच्या मदतीनें अण्णाजी दत्तो आणि शिर्क्यांनीं शंभुराजांना उडविण्याचा दुसऱ्यांदां डाव मांडला. पण दैवी घटनेनें फांसा उलटला! आबासाहेबांचे साथीदार हत्तीच्या पायीं दिले! शिर्क्यांचीं शिरें अस्मानांत उडालीं! मासाहेब येसूबाईच्या पुण्याईनें आसरा दिला म्हणून खंडू निळूसारखीं पोरें नांवसांगीला जिवंत राहिलीं; नाहींतर चिटणीस घराण्याची बेचिराखी उडालीच होती कीं नाहीं? अशा ह्या सिंहाच्या जबड्यांत घरधनिणींचें कुंकू पुसून पुनः कोण शिरणार? संभाजीराजांच्या रागाचा अग्निनारायण नांदत्या घराची होळी उडवून तिथून गाढवाचे नांगर फिरवील हें अलम दुनियेला ठाऊक झालें असतां आतां राजाराममहाराजांना तरी पाठबळ कोण देणार?

ताराऊः—पिसाळ, तुम्ही शिपाईगिरीचे बांके लढवय्ये; बुऱ्या घडीच्या असल्या तंगीनें गांगरून जातां? अहो, दौलतीच्या उलाढालींत रक्ताची रंगपंचमी सदाच चालायची! राजकाजाच्या धाडसी खेळांत कच्च्या दिलाचा खेळखंडोबा कुण्या कामाला पडणार? तुम्ही खाशांच्या खातरजमेचीं माणसें, म्हणून जिवाच्या गोष्टी खुलेपणानें मांडतें; पण तुमचें घाबरणें तर बहुल्यावरच्या पोरीचें!

सूर्याजीः—आम्ही खातरजमेचे बेदरकार मावळ मराठे. आम्हांला नव्या नवरीच्या पंक्तीला सरकारनीं बसविलें तरी आमच्या चाकरीच्या उचलीची खची थोडीच होणार! सरकार, मी ती रयतेची बात बोललों. हा सूर्याजी पिसाळ निमकहराम नाहीं. निमकहलालीनें भाकरीच्या चाकरीला खडाखम्ब राहील.

ताराऊः—आजमितीला तुमची भाकरीची चाकरी कुण्या ठायीं बजावली जाते?

सूर्याजीः—छत्रपति भोंसल्यांच्या दख्खनदरबारीं रायगडाच्या ह्या अभेद्य किल्लेकोटांत सरकार!

ताराऊः—मग त्याच भोंसल्यांची दख्खन-दौलत रंगबाजीच्या वावटळींत मातीमोलानें उडून चाललेली ह्या निमकहलाल इमानी डोळ्यांना

दिसत नाहीं का? दारूच्या धुंदीनें छत्रपतींच्या तक्ताच्या झोकांड्या अलमगिराच्या दिल्लीदरबाराकडे झुकताहेत, ह्या आठवणीची उचकी चाकरीच्या भाकरीचे घांस गिळतांना ह्या मावळमराठ्याला डांचत नाहीं का? अव्वल राजेपणा लयाला जाऊन, रिकामटेकड्या फटिंगाच्या बुद्धिबळांतल्या राजाची हालत हिंदुपदपादशहाला आली आहे, हें बेमान नसलेल्यांना उमगत नाहीं का?

सूर्याजीः—सरकार, नुसतें उमगल्यानें काय होणार? धरित्री हदरली कीं, धरणीकंपाचे धक्के बसताहेत हें उमगणें अवघड नाहीं! पण कुण्या उपायानें धक्का खात्रीनें टळतो हें समजणें बडें मुष्किल आहे.

ताराऊः—होय. आणि म्हणूनच अंगचोर ऐद्यांना फावतें. बढाई-खोरांच्या फुशारक्यांना बिनकामी थैमान घालायला सांपडतें. कर्त्यांची कर्तबगारी आणि ऐतोबांची सोदेगिरी सर्रास एका मापानें अजमावली जाते! बुडती दख्खनशाही तारण्यासाठीं तळमळणारी ताराऊ गरजवंत म्हणून तोंड वेंगाडते आणि संभाजीराजांच्या धास्तीनें बढाईच्या पांघरुणांत लपणारे पिसाळ रयतेचा दिल दबून गेल्याच्या बाता झोकतात.

सूर्याजीः—वेळेस वाटलें, मनाला पटलें, तें दिलसफाईनें बोललों; उणेंअधिक बोलून धन्यांचा अपमान करावा असा चाकराचा इरादा नाहीं. दिला मनसुबा सरकारला नावडता झाला, सोडून दिला! पण ह्या हिंमत-वानाला भित्रा ठरवून बढाईखोरांत ह्याची गणना करतांना केल्या चाकरीची ओळखसुद्धां सरकारला टिकूं नये; ह्याचा मात्र अचंबा वाटतो! कुण्या वेळीं संकटांत उडी घेतली नाहीं म्हणून हा बांका शिपाई अंगचोर ठरला सरकार?

ताराऊः—आजवर खचित ठरला नाहीं; पण आतां ठरेल अशी धास्ती वाटते.

सूर्याजीः—कशावरून? आरोप शाबितीला दाखला?

ताराऊः—शंभुराजांच्या धास्तीनें ताराऊची मसलत झुगारू पाहतां, हाच दाखला!

सूर्याजीः—मी धास्तीनें मसलत झुगारतों आहें असें सरकारला वाटतें, पण सूर्याजीच्या मनाची उचल बिलकुल न्यारी आहे. अशा वेळींच टिपण साधावें, कीं शिकार सुटणार नाहीं. तिरंदाजी तीच खरी, कीं तीर बांधा

जाणार नाहीं. चालू मसलतींत सरकारला आणि चाकराला बेशक कमाई आहे अशी खातरजमा होईल तर निवांत जिवाची खैरात मांडून मसलत निभावून नेईन. पण बेफायदा धुडकोसांत जीव रमणार नाहीं सरकार.

ताराऊः—बेफायदा धुडकोसानें इत्तीच्या पायीं जीव बांधायला इतरांचे प्यारे जीव तरी कुठें वर आलेत? पिसाळ, जरा उघड्या डोळ्यांनीं सभोंवार पहा! दिल्लीचा अलमगीर, मुंबईचा टोपीकर, गोंव्याचा फिरंगी आणि जंजिऱ्याचा शिद्दी; अशी ही लढाईची चौफेर तंगी! अनुभवी मातबरांची कत्तल उडालेली! मराठ्यांचा अवघा फौजफांटा बाजार-बुणग्यांनीं गजबजलेला! सगळी रयत जमीनमहसुलानें आणि दंग्या-धोप्यानें हैराण झालेली! अष्टप्रधानकीची अंमलबजावणी एकट्या कलुषाच्या हातीं एकवटलेली! आणि महाराष्ट्राचा राजा दारूच्या धुंदीनें बेफाम बनून बदफैली तुळशीच्या रंगांत दंग झालेला! अशा निकरावर आलेल्या बेबंदशाहींत स्वारीची सुटका तुम्हांला मुष्कील वाटते? चोर-कसबानें आणि पक्कया दिलानें कारस्थान उरकाल तर दख्खनदौलतीचा हा झुकता मनोरा भक्कम बळानें यावचंद्र खडा राहील. कलुषाकब्जीची दारुडी दुनिया, मावळमराठ्यांच्या दारूकामांत जळून खाक होईल. सूर्याजी-राव, आज हिम्मत धरून कंबर कसाल तर तुम्ही नुसते वांईचे देशमुखच नव्हे, तर हिंदुपदपादशाहीचे हिंमतबहाद्दर बनाल!

सूर्याजीः—(स्वगत) ह्या बयेला तूर्तातूर्त रुकार देऊन, मोकळें झाल्या-विना सुटका नाहीं.

ताराऊः—पिसाळ, मी वाऱ्याशीं नाहीं बडबडलें! जिभेनें जबाब नाहीं दिला? मी रडतराऊत तर घोड्यावर बसवीत नाहीं?

सूर्याजीः—छे! छे! सरकारच्या दूरदर्शी मुत्सद्देगिरीनें जरा थक्क झालों! पण सरकार, चाकराचा दिल अजमावण्याआधीं राजाराममहाराजांच्या संथ तब्येतीला हें वांवडें मानवेल कीं नाहीं याचा आधीं अंदाज घेतला का?

ताराऊः—नाहीं अजून.

सूर्याजीः—मग पाठिंब्याशिवाय प्यादें निजोरी मरणार नाहीं का सरकार? शिराशिवाय धडाची धडपड मुडद्यामोलाची! त्याला जिवंतपणा कुठून आणावा?

ताराऊः—पण त्याबरोबरच धडांत ताठरपणा असल्याची निश्चंती झाल्याविना शिराची धडपड तरी कुण्या किफायतीची? धडाशिरांची खंबिरी हीच कार्याची मुहूर्तमेढ!

सूर्याजीः—मग शिरावेगळें धड प्राणांतींही होणार नाहीं. चालू कारस्थानांत अपयश आल्यास चितेवर आणि फत्ते झाल्यास दौलतीच्या इतमामावर शिराशेजारीं धड आहेच आहे, याची खात्री असावी. [पडद्यांत दवंडी–रायगडावरील तमाम गडकरी हो! छत्रपति संभाजीराजांनीं शिर्क्यांचें शिरकाण केल्यामुळें मोगलांना जाऊन मिळालेले गणोजी शिर्के, भोंसल्यांचा निर्वंश करण्याची प्रतिज्ञा करून कालपासून गडावर गुप्त वेषानें वावरत आहेत. असा गुप्त हेरांचा नक्की तलास आहे! तरी जो कोणी त्याला पकडून देईल त्याला पांच गांवें इनाम आणि दरबारांतून बहुमान मिळेल हो!]

सूर्याजीः—(स्वगत) अरे बाप! घात झाला! ही शिर्क्यांची बातमी शंभुराजांना कशी कळली? [राजारामराजे घाईघाईनें प्रवेश करितात.

राजारामः—पिसाळ! पिसाळ! ऐकलीत ही दवंडी? कोण गाफील-पणा हा! माचीची नाकेबंदी ओस पडली, कीं गडाचे टेहेळे जमीनदोस्त झाले? परस्पर हुजूरपर्यंत खबर पोहोंचून दवंडी पुकारली जाते, ही काय किल्लेदारी समजावी? किल्लेदार, ही मूर्तिमंत तुमच्या हलगर्जीपणाचीच द्वाही पुकारली जाते असें समजून, आधीं घोडदौडीने राजवाडा गांठा. इथें शिळोप्याच्या गोष्टी झोडतां आहां, असें खाशांच्या कानीं गेलें तर भलत्या संशयानें सर्वांचेंच मरण ओढवेलना हकनाहक!

सूर्याजीः—नाहीं महाराज, घोड्यावर मांड ठेवायची खोटी, कीं नगारखाना गांठलाच म्हणून समजा.

राजारामः—दादासाहेबांचें कुशल वर्तमान धाडा बरें.

सूर्याजीः—जी सरकार. [सूर्याजी जातो.

ताराऊः—(स्वगत) बंधूच्या बंदिखान्यांत सगळी उमर गुजरायची पाळी आली, तरी त्यांच्या कुशलाची कोण काळजी! (उघड) खाशांसाठीं इतकें बावरायाचें कशाला? भोंसल्यांचा वाडा म्हणजे कांहीं दरीखोऱ्यांतली राई नव्हे, कीं आड जंगलांतली बनशाही नव्हे! चांगला स्वाराशिबंदीनें

नटलेला, इंद्राच्या ऐश्वर्यानें थाटलेला, एकशेंआठ तोफांच्या सलामीची सरबत्ती झडणारा राजवाडा आहे !

**राजाराम**:—होय राणीसाहेब ! तो बरकंदाज राजवाडा आहे म्हणूनच जरुरीनें काळजी वाटते ! ती एखाद्या भणंगाची झोंपडी असती, आम्ही भणंगभिकारी असतों, तर धास्तीनें बावरून जायचें कारणच नव्हतें.

**ताराऊ**:—वा ! मग राजांचे राजवाडे म्हणजे प्राणांतिक धास्तीचीं मायघरंच म्हणायचीं !

**राजाराम**:—होय, जुलमी किंवा बदफैली राजांचे राजवाडे म्हणजे सदा-सर्वकाळ परमावधीचीं पातकें घडणारे, भर उजेडीं रक्ताचीं कारंजीं उडणारे, खाटीकखानेच ! ह्या बेबंदशाहीच्या माजुरी डोळ्यांना, पतिव्रतांच्या पातिव्रत्याची दैदीप्यमान उज्ज्वलता आणि रंगेल्या कलावंतिणीची रंगेली वृत्ति, सर्रास एका रंगाची दिसत असते ! स्वातंत्र्यासाठीं झगडणाऱ्या महापुरुषांचीं मस्तकें, भयाण मृत्यूच्या पावलांखालीं सांपडलेलीं असतात; आणि स्वार्थाच्या आशेची पोळी भाजण्याकरितां, स्वजनांची राखरांगोळी करूं बघणारे बेफाट भोंदू, राजाचे जिगरदोस्त बनलेले असतात ! खऱ्या न्यायाची चाड राखायला, रयतेची कर्तबगारी जोमास लावायला, रामाची अयोध्या पुनः थाटायला, एका छत्रपतीचा अवतार व्हावा लागतो.

**ताराऊ**:—मग आजघडीला दौलतीवर विराजणारे छत्रपति, खरे छत्रपति नव्हेत तर ?

**राजाराम**:—खरे छत्रपति आहेत ! एकदां नव्हे, लाखदां छत्रपति आहेत ! पण पूर्वपरंपरेनें तक्तनशीन झालेले नांवाचे छत्रपति आहेत ! काय सांगूं ? ऊर भरून येतो ! आमचे दादासाहेबही आबासाहेबांसारखे छत्रपति असते, तर गादीपायीं आबासाहेबांच्या खांद्याला खांदा भिडवून लढलेले, दौलती-च्या सलामतीखातर रक्तामांसानें जोडलेले आमचे शिर्के, आम्हां भोंसल्यां-च्याच नरडीला नख द्यायला कशाला धांवले असते ? बाळाजीपंता-सारख्या जातिवंत फड्र्या चिटणिसाच्या रक्तानें भोंसल्यांचा हात कशाला माखला असता ? भिंतींत चिणून मारलेल्या माझ्या मातेच्या त्या करुण किंकाळ्या—नको ! त्याची आठवण नको. आंतड्याला पीळ पडतो ! झालें

तें झालें ! भोंसल्यांच्या कुलस्वामी शंभुदेवा, आमच्या शंभुराजांना छत्रपतीची बुद्धि आणि उदंड आयुष्य द्या, म्हणजे झालें !

**ताराऊ:**—ऐका बरें भोळ्या शंकरा ! दौलत रसातळाला न्यायला त्याला उदंड आयुष्य द्या आणि ह्या भोळ्या शंकरांना असाच बंदिवास भोगूं द्या.

**राजाराम:**—राणीसाहेब, आमच्या रंजीस मनाला तुमच्या तेढ्या बोलांची मातबरी वाटते असें का समजतां ? गजबजलेल्या गडावर सुडाची सुरी फिरत असतांना, ही घरभेदी बुद्धि तुम्हांला कां सुचते ? मत्सरी मनाला आवर घाला ! आलेलीं अरिष्टें नष्ट होतील; बोललेले बोल मागें राहतील; आणि परिणामीं कांट्याप्रमाणें तुमच्या जिव्हारीं बसतील.

**ताराऊ:**—छे ! छे ! भलतेंच ! असें कसें बरें बोलेन मी ? अशानें भोंसले कुळींच्या दुर्लौकिकाचा डंका नाहींका गाजायचा त्रिभुवनांत ? झाडून सारे स्वर्गींचे तेहतीस कोटि देव टाहो नाहीं का फोडायचे अशानें ? हें तोंड मिटलें ! पूर्वजन्मींचीं पातकें आजघडीला आडवीं पडत असलीं, तर मुक्या मनाचा कोंडमारा टाळतां टळायचा नाहीं ! आल्या भोगांना आजपासून राजी राहीन बरें ! मग मला बंदिवास घडो कीं देहदंड पडो !

**राजाराम:**—वाहवारे नशीबा ! राजापोटीं जन्म; गुलामाची परतंत्रता ! जन्माची सोबतीण दुःखावर डागण्या देणारी ! जिवाभावाचे आप्त सुरा घेऊन उठलेले ! मनांतलें दुःख सांगेन म्हटलें तर जिवाचा संवगडीसुद्धां नाहीं.

[ खंडूजी घाबऱ्याघाबऱ्या धांवत येतात.

**खंडूजी:**—हा चिटणिसांचा बच्चा आहेना सरकार !

**राजाराम:**—कोण ? बाळाजी आवजीचा कुलदीपक मासाहेबांचा छोटा चिटणवीस ! माझा खंडोबा ! अहाहा ! शंभर वर्षें आयुष्य आहे बेटा. गहिंवरानें जिवाचा संवगडी म्हणतांना एकटी तुझी मूर्ति मला आठवली. आणि सख्या, खरोखरच तूं आलास ! मला एकदां साष्टांग भेटूं दे ! आमच्या खंडोबानें सोबत केल्यावर, भयाण मृत्यूशींही झगडायला आम्ही डरणार नाहीं !

**खंडूजी:**—तेंच सांगतों आहें. महाराजांनीं थोडा वेळ हुशारीनें असावें. खासा स्वारी बेफाम बनून येत आहे ! बरोबर तो बेरड कब्जीही आहे.

**राजाराम**:—खंडोबा, काय सांगतां? तुमचे गोंधळलेले शब्द मला संकटाची कल्पनाच येऊं देत नाहींत! दमानें बोला.

**खंडूजी**:—दमानें काय बोलूं; शंभुराजे आतां हांक दो हांकेवर आले असतील! किल्लेदारांची स्वारी चौखूर घोडा उडवीत राजवाड्याकडे दौडत होती, इतक्यांत समोरून शंभुराजे येत आहेत असें पाहून, त्यांनीं तोफखान्याचा आडोसा घेतला; पण त्या सहज गोष्टीचा संशय घेऊन, शिर्के प्रकरणाशीं त्याचा संबंध असावा असा बदसल्ला कलुषानें शंभुराजांना दिला. सूर्याजी गिरफदार झाले! आणि आपल्याकडे मोर्चा वळला आहे. [पडद्यांत—दगलबाज! बोल, कुठें आहे गणोजी शिर्के?] ही स्वारी आलीच वाटतें? महाराजांनीं जरा वेळ निभवावी. मी मासाहेबांना घेऊन आलोंच!

[ खंडूजी जातो.

**राजाराम**:—राणीसाहेब, पडदानशीन व्हा, हुजूर स्वारी आली.

[ ताराऊ गोषांत जाते, दुसरीकडून सूर्याजीला धक्के देत **संभाजीराजे** येतात. बरोबर **कलुषा** कब्जी व एकदोन हुजरे.]

**संभाजी**:—बेवकूब! कोणत्या कमाईसाठीं बेमानी पत्करलीस? घराला सोन्याचीं कौलें चढवलींस, कीं किल्लेदारिणीला मोत्यानें मढवलीस? मराठेशाही एकटा संभाळीन, अशा तोऱ्यानें मिशांना पीळ भरतोस आणि उनाड मैनेप्रमाणें परक्याला घरट्यांत घेतोस? राजाराममहाराज, आम्ही तुमचे वडील बंधु; फितुरीबाबत आपल्याला जाब कसा पुसावा?

**राजाराम**:—शंभुराजांप्रमाणें राजारामही वडिलांचें न[illegible] छत्रपति शिवाजीमहाराज असेंच लावतो. मग फितुरीबाबत आम्हांपाशीं जाब मागायची पाळी कां आली?

**कलुषा**:—हुजूरना पन्हाळगडावर कैदेंत ठेवून गादी बळकावण्याची—

**राजाराम**:—चूप! दादासाहेबांशीं बोलण्याचा मी मान मागतों.

**संभाजी**:—कब्जींचाच खुलासा रीतसर आहे. गेल्या गोष्टी इतक्या जबरदस्त आहेत, कीं सात पिढ्यांपर्यंत नुसत्या जिभेनें जिवंत रहातील; मग त्याच पिढींतल्या, त्याच कुळींतल्या, स्वतःच कत्तलीला कारण झालेल्या

राजाराममहाराजांनीच जाब मागायचें कारण विचारावें! मस्तक कसें भणभणून जातें!

**राजाराम**:—कत्तलीला मी कारण झालों नाहीं; हुजूरचें आडदांड बालपण कारण झालें. आबासाहेबांप्रमाणें अष्टप्रधानांची समजूत, कीं शंभुराजाहून राजाराम राजा बरा; त्यानें हा राजाराम कसा दोषी ठरतो? आधीं मी कधीं दोषी नव्हतों आणि आजही नाहीं.

**संभाजी**:—राजाराममहाराज! मी एक साधासीधा शिपाईगडी आहें! पहाडाजंगलांतून शिकारी मारणें आणि दुस्मनांच्या तटबंदीवर टकरा घेणें, हा आमच्या कर्तबगारीचा दस्तुर आहे. शराबीच्या धुंदीचे आणि प्रीतीच्या रंगेल्या बंदीचे आम्ही विसाव्याचे कैदी! छेड काढल्याविना आम्हांला आमच्या रंगांतून जागही येणें मुष्कील! बुद्धिबळानें आम्हांला खेळतां येत नाहीं आणि दुसऱ्यांनीं आम्हांशीं खेळलेलें आम्हांला खपत नाहीं! आम्ही गादीवर येण्यांत दौलतीला धोका आहे अशा अंदाजी हिशेबानें आम्हांला जन्मठेपीचे कैदी करण्याचें कारस्थान करण्यापेक्षां, राजाराममहाराजांना छत्रपति होऊं द्या, असा सीधा सवाल अष्टप्रधानांनीं टाकायचा होता; त्या घडीला सिंहासनाच्या पायऱ्या उतरून, मानानें मुजरा ठोकला नसता तर भोंसल्यांची अवलाद सांगितली नसती!

**राजाराम**:—अहाहा! अंगावर आज मूठभर मांस चढलें! आबासाहेबांनीं नेहमीं म्हणावें "यथा राजा तथा प्रजा, राजानीं निस्वार्थी राहिलें पाहिजे" वडिलांनीं सातासमुद्रापारही रूढ होईल अशी अष्टप्रधानकीनें अधिकार-विभागणी करून, स्वार्थत्यागानें वैराग्यदर्शक भगवा झेंडा नाचविला. दादासाहेबांनीं आज कुळाचाराचा उच्चार केला, मग आमच्या पोटीं तरी फितुरीचें पाप कसें मावेल! छत्रपतींच्याच पायाची आण, कीं राजाराम हा छत्रपतिपदाची रखवाली आणि रखवालीच करील. सिंहासनाला यावज्जीव पाय लावणार नाहीं!

**संभाजी**:—मग शिर्क्यांला गडावर घेण्याचें कारण?

**राजाराम**:—गणोजी शिर्के गडावर येण्यांत माझें बिलकुल अंग नाहीं. झाल्यागेल्या गोष्टींनीं स्वारी जबरदस्त संशयी बनली आहे. कित्येक दिवसां-



**यसूबाई**:—हं खबरदार बजावा !    [ अंक १ ला-प्रवेश १ ला-पृष्ठ ११.

पासून खाशांना मावळ मराठ्यांचा भरंवसाच वाटेनासा झाला आहे, हें आम्ही जाणतों. पण हुजूरच्या पायाची आण वाहिल्यावर संशय उरूं नये.

**कलुषाः**—जिवाशीं बेतल्यावर लटक्या शपथांचा आधार घेणें भोंसल्यांच्या ब्रीदाला कलंक फांसणारें आहे. कालीमातेचा दृष्टान्त कसा खोटा ठरेल हुजूर?

**संभाजीः**—राजे, भवानीच्या शपथेनें सांगा घडीही लोटली नसेल, हा मांग पिसाळ इथें नव्हता?

**सूर्याजीः**—अलबत होतों! शिरस्त्याप्रमाणें कैद्यांची खबर घेत होतों.

**संभाजीः**—कैद्यांची खबर घेत होतों? धन्याच्या मानेवर सुडाची सुरी तळपत असतां, कैदखान्यांत हुद्देदारी गाजविण्याचा मतलब?

**सूर्याजीः**—धन्याची इमानेंइतबारें चाकरी बजवायची, हाच मतलब!

**संभाजीः**—नरडीचा घोट घेईन! बदमाष! इमान हा शब्द या जन्मीं उच्चारूं नको. इमान ठेवून चाकरी बजावतास तर रायगडाच्या पायरीवर गणोजी शिर्क्यांचीं फितुरी पावलें उमटायची मगदूर नव्हती! राजाराममहाराज, तुमच्यासारख्या मोलाच्या मोहऱ्यानें कारस्थानाचा जीव घातल्याविना हे पिसाळासारखे मेले मुडदे नाचत सुटलेले नाहींत! पण जिवाशीं गांठ घाला, कीं तमाम शिर्क्यांच्या माना मुरगळलेल्या मनगटाची मर्दुमकी आम्हीं चुड्याबांगड्यांनीं सजविलेली नाहीं. भरबाजारांतून गाढवावरून धिंड काढूं! टकमकटोंकावरून कडेलोटानें ठार करूं. सूर्याजी! भलाईनें कबुली देऊन, स्वतःचा बचाव कर! नाहीं. तोंड उघडीत नाहीं? कोण आहे दौलती? उडाव चाबूक. फेरसे उडाव! फेरसे उडाव! सबूर! सूर्याजी, उगीच मरणाला आमंत्रण करूं नको. घडल्या गोष्टींची समूळ सांगड आमच्या कानीं घालशील तर अजूनही आम्ही माफीची दिलदारी दाखवूं!

**सूर्याजीः**—कारस्थानच नाहीं तिथें काय बोलूं सरकार? गरीब हकनाक बळी पडतोय हुजूर!

**संभाजीः**—अजून हड्डी नरम नाहीं झाली! दौलती, फेरसे चाबूक उडाव! फेरसे उडाव! [ येसूबाई येते.

**येसूबाईः**—खबरदार दौलती!

**खंडूजीः**—मासाहेबांची स्वारी झाली. कब्जी गोषा आला हं!

[ खंडूजी कब्जीला जाण्यास खूण करतो.

**कलुषाः**—अरे, अरे, अरे! माझ्या घनचक्कर डावाचा ऐनवेळीं हिरमोड झाला. ह्या चिटणिसाच्या कार्ट्याला ठेंचला पाहिजे किंवा शंभुदेवाला तरी इथून काढला पाहिजे. एरवीं कांहीं आपलें बस्तान बिनघोर बसायचें नाहीं.

[ जातो.

**खंडूजीः**—(स्वगत) गणोजीला गडावर घेण्यांत ह्याचेंच अंग असावें असा मला जबर वहीम आला आहे. तेव्हां ह्या साडेसातीचा इतक्यांत पिच्छा सोडून भागणार नाहीं. [ जातो.

**येसूबाईः**—[शांतपणानें पुढें येतात.] दंगल कसली माजली आहे? काय? खाशांना इथवर येणें पडलें! सूर्याजी, कांहीं गुन्हा घडला वाटतें? जरा काळ-वेळ पाहून वागायचें समजत नाहीं. भाऊजींची मुद्रा अशी कष्टी कां? डोळ्यांना पाणी! असें तोंड कां लपवावयाचें? बोलायचें नाहीं का भाऊजी?

**संभाजीः**—काय बोलणार ते! डोळ्यांना डोळा द्यायला धीर नको व्हायला? राणीसाहेब, ज्यांच्या कैवारी झालांत त्यांनींच तुमच्या मंगळ-सूत्राला हात घातला!

**येसूबाईः**—कोणत्या काळसर्पानें आपल्या कानाचा असा चावा घेतला? सर्पाच्या जिभेशिवाय हें हलाहल संभवतच नाहीं. जातिवंतांनीं अशी जीभ विटाळली तर पाप लागेलना!

**संभाजीः**—राणीसाहेब, कलुषाकब्जींना—काशीक्षेत्राच्या हातखंडा मांत्रिकांना कालीमातेनें दिलेला दृष्टान्त आपण झूट मानतां?

**येसूबाईः**—मांत्रिकाचा काय संबंध इथें? हा आमच्या कुंकवाचा प्रश्न आहे! आम्हांला रंडकी करणाऱ्यांचा आम्ही कैवार घेऊं का? दुहीसांजा भाऊजींच्या भेटीविना कधीं अन्नाला जीभ लावली नाहीं, कीं देवीला हळदी-कुंकूं वाहिलें नाहीं. कांहीं कारस्थान असतें तर आम्हांला नसती का खबर? शिवाय, दवंडी पुकारली तेव्हां आम्ही इथेंच होतों. पिसाळानीं महादर-वाज्याकडे घोडा उडविला आणि आमचा मेणा जनानखान्याकडे वळला!

**राजारामः**—(स्वगत) आमच्या बचावासाठीं धडधडीत खोटें बोलली ही माउली!

**संभाजी**:—राणीसाहेब, कब्जी खोटे आहेत, असें म्हणायचें आहे का आपल्याला ?

**येसूबाई**:—आजच असें कोणत्या तोंडानें म्हणावें आम्हीं ! कब्जीच्या खरेखोटेपणाची पारख होईल कधींना कधीं ! आज इतकें खरें, कीं देवीचा दृष्टान्त समजून घेण्यांत कांहींतरी गोंधळ उडतो आहे त्यांचा ! आम्हां भोंसल्यांची पुण्याई सबळ आहे. भोंसल्यांनाच देवीचा दृष्टान्त घडतो असा गेल्या तीन पिढ्यांचा दाखला आहे. मांत्रिकाकडून असा विपरीत दृष्टांत ऐकायची आम्हां घरीं रीत नाहीं आणि ती पडायचेंही कारण नाहीं. कब्जीनाच जरा खोदून विचारलें म्हणजे होईल खुलासा सगळा !

**संभाजी**:—राणीसाहेब, आपल्या मर्जीखातर कब्जीच्या मंत्रतंत्राच्या बाता झूट मानल्या तरी शिर्क्यांच्या फंदफितुरीला राजाराममहाराजांचें पाठबळ नाहीं असें आम्हीं कां मानावें ? ज्या शिर्क्यांनीं पूर्वीं अष्टप्रधानांचे संगनमतानें यांना छत्रपति बनवून आमचा पन्हाळगडाच्या कोंडवाड्यांत कोंडमारा करायचा घाट घातला, त्याच त्यांच्या कैवाऱ्यांनीं आज राजवटींत फितुरीचा धिंगाणा माजविल्यावर या फितुरीपासून राजारामराजे कसे वेगळे राहूं शकतील ?

**येसूबाई**:—अलबत् राहतील. ज्यांना ज्यांना म्हणून दख्खनदौलतीची शोभा राखावयाची आहे, अशीं नररत्नें महाराष्ट्रांत भाऊबंदकीची बेबंदशाही माजवायला कधींही उद्युक्त व्हायचीं नाहींत. गेल्या गोष्टींच्या दाखल्यावरून खाशांना भाऊजींचा वहीम येतो खरा; पण वहीम म्हणजे कांहीं पुरावा नव्हे ! आणि मुद्यापुराव्यानिशीं फितुरीची शाबिती झाल्याविना या प्रकरणीं खाशांना मुळींच न्यायनिवाडा देतां येणार नाहीं.

**संभाजी**:—राणीसाहेबच कैवारी तेव्हां बारकाईची फेरचौकशी व्हायला पाहिजे ! पण पुराव्याचें माप पदरीं पडलें म्हणजे मग ?

**येसूबाई**:—महाराष्ट्राची मी महाराणी आहें. सख्खा दीर असला तरी स्वतांच्या हातांनीं कडेलोट करूं मग !

**संभाजी**:—ठीक आहे ! दौलती, या पिसाळाला कैदेंत ठेव. कब्जींच्या मुलाखतीनें लौकरच निकाल लागेल राजाराममहाराजांचा !

[ **संभाजी व हुजरे जातात.**

**राजाराम**:—कर्जीच्या मुलाखतीनें राजाराममहाराजांचा निकाल! मासाहेब, न्यायान्याय जगांतून नष्ट झाला नाहींना? योग्यायोग्यतेला तिलांजलि दिली गेली नाहींना? सत्यासत्याची राखरांगोळी झाली नाहींना?

**येसूबाई**:—हें काय भाऊजी! शककर्त्यांपोटीं जन्म घेतल्यावर, 'नेता, नेता' म्हणून सगळ्या राष्ट्रानें आपणांकडे डोळे लावल्यावर, आपणच धीर खचल्यागत आंसवें ढाळूं, तर ह्या बेबंदशाहींत रयतेनें कुणाच्या तोंडाकडे बघावें! खोट्यांच्या संगतीनें खाशांना रंगबाजीच्या फंदीं पाडलें आहे. कैफानें बेभान बनवून गादीपायीं सोयऱ्याधायऱ्यांच्या वैराला उद्युक्त केलें आहे. महाराजांना गादी हवीशी होतांच रयतेंतही आप्पलपोटेपणा माजून कुणाचा पायपोस कुणाच्या पायीं नाहीं, अशी गत आली आहे. 'यथा राजा तथा प्रजा!' पण आजची गत सदाची आहे, असें बरीक समजूं नका. सिध्या तब्येतीच्या माणसांना कधींनाकधीं उपरति झाल्याविना रहात नाहीं. वाटमाऱ्या वाल्या कोळ्याचा वाल्मीक झाला. जन्मदात्यांना लाथा घालणारा पुंडलीक भक्तिभावाच्या भुकेल्या भगवानाला अठ्ठावीस युगांची खडीताजीम द्यायला समर्थ झाला. मग महाराष्ट्रानें असें कोणतें पातक केलें आहे कीं, देवानें स्वारीलाच तेवढी उपरति घडवूं नये! आबासाहेबांनीं दौलतिच्या निशाणीवर निस्वार्थबुद्धीनें भगवा रंग चढवला; त्यांच्याच शिकवणीला अनुसरून निस्वार्थबुद्धीनें आल्या संकटाचे आपण घाले सोसूं या. म्हणजे महाराष्ट्राच्या भगव्या झेंड्याला मायभवानी उदंड आयुष्य दिल्याविना रहाणार नाहीं.

---

## प्रवेश दुसरा

[ खंडूजी व शाहीर बोलत येतात.]

**खंडूजी**:—छे, छे! शाहीर, दुस्मनांची हमखास भेट घेणारी तरबेज माणसें तुम्ही! तुम्हीच, असे जर हातपाय गाळूं लागलां तर आम्हीं काय करावें?

**शाहीर**:—खंडूजी, माझ्या पंचप्राण चंद्रावळीविना मला दाही दिशा उदास झाल्या आहेत! उमेद कशी ती राहिली नाहीं! शिवाजीमहाराजांच्या

मर्जीतला मी शाहीर! प्राणांतींही खोटीं गाणीं गायचीं नाहींत हा माझ्या शाहीर घराण्याचा कुळाचार अलम दख्खनला महशूर असतां, तुम्हांला ठाऊकच आहे, त्या नीच कब्जीनें भरदरबारांत मला शंभुराजांचा पोवाडा गायचा हुकूम केला! योग्य वेळीं शंभुराजांचे पोवाडे गाईन असें उत्तर करतांच, माझ्या चंद्रावळीला ओलीस म्हणून शंभुराजांकडून कैद करवून माझ्या जिव्हारीं घाव घातला! ह्या घावानें मी अति हैराण झालों आहें. सात पिढ्यांपासून चालत आलेला कुळाचार मोडूं, कीं जन्माची सोबत चंद्रावळ सोडूं! काय करूं काय न करूं! ह्या कोंडमाऱ्यांत जीव बेजार झाला असतां, गणोजी शिर्क्यांच्या फितुरीचा छडा लावण्याची मसलत माझ्यानें कशी पार पडेल?

**खंडूजीः**—तुमच्या चंद्रावळीसाठीं तरी उमेद धरालना?

**शाहीरः**—अलबत धरीन! जिवांत जीव असेतों हिंमत खचणार नाहीं. कुळाचा अधःपात न होतां गृहलक्ष्मीला मुक्त करण्याची कुणी सल्ला देईल, तर मी त्याचा जन्मजन्मांतरीं ऋणी राहीन; पण असा चिंतामणि कुठला भेटायला!

**खंडूजीः**—मी देतों तशी सल्ला!

**शाहीरः**—काय अमृतवाणी ऐकवितां?

**खंडूजीः**—अमृतवाणी नाहीं, पण विष ओकावें लागणार आहे मला. गणोजी शिर्क्यांनीं गडावर फितुरी केल्याची खबर तुमच्या कानीं आहेना?

**शाहीरः**—बरें, मग?

**खंडूजीः**—या फितुरीशीं कलुषाकब्जीचा लागाबांधा असावा असा मला जबर वहीम येतो आहे. आणि गडाच्या टेहळ्यांचा व सूर्याजीचा कयासही माझ्या तर्काशीं मिळता आहे! तेव्हां ही गुप्त बातमी घेण्याकरितां आज रात्रीं हिकमतीनें कब्जीच्या गुप्त खलबतखान्यांत शिरकाव करून घेण्याचें धाडस कराल तर त्या ठिकाणीं तुमची चंद्रावळ तुम्हांला दिसेल!

**शाहीरः**—माझ्या चंद्रावळीला त्या भयाण जागीं कुणीं नेली?

**खंडूजीः**—ओलीस म्हणून तिला कैद करविण्यांत चंद्रावळीसारख्या रूपवतीची प्राप्ति करून घ्यायची, हाच डाव कब्जीला साधायचा होता!

शाहीरः—बस्, बस् करा खंडूजी! माझ्यानें ऐकवत नाहीं पुढें! मस्तक बधिर झालें! संताप असा अनिवार होतो आहे, कीं मी धरणीवर कोसळेनसें वाटतें. असा जाऊन त्या मांगाला ठार करूं का?

खंडूजीः—हं हं, शाहीर! अशाकरतां का मी तुम्हांला सावध करायला आलों? सगळा सह्याद्रि ज्याच्या नांवानें खडे फोडतो आहे, तो कब्जी, कुणींही गळा कापावा अशा ढिलाईनें वावरतो असें का तुम्ही समजतां? ह्या आगलाव्यानें आबासाहेबांच्या मरणापासून शंभुराजांचे मनीं संशयाचा वणवा पेटवून गाजी गाजी म्हणून गाजलेल्या बहाद्दर गड्यांचीं डोकीं मारविलीं आहेत, हें तुम्ही जाणतां! कर्त्याकर्त्या अक्कलवंतांना घरकोंबडे बनवून अष्टप्रधानांचे अधिकार मनमानेल तसे हा चांडाळ उपभोगतो आहे, हें तुम्ही पाहतां! त्याच्या नुसता केंसाला धक्का लागला तर शंभुराजे पाळेंमुळें खणून काढण्याइतके बिथरतील, ह्याची पुरेपूर जाणीव असतां कब्जीवर तडकाफडकी चाल करून कसा निभाव लागणार आणि उपयोग तरी काय होणार?

शाहीरः—मग ह्या सर्पाला कसा ठेचूं म्हणतां?

खंडूजीः—त्याला ठेंचायचाच तर आज त्याच्या गुप्त खलबतखान्यांत शिरकाव करून घेऊन त्याच्या फितुरीचा छडा काढला पाहिजे आणि मग हा सूर्य आणि हा जयद्रथ असा खात्रीचा देखावा शंभुराजांच्या नजरेस आणून तुमच्या चंद्रावळीचीच नव्हे, तर सगळ्या दख्खनची इडापीडा टाळली पाहिजे!

शाहीरः—ठीक आहे.

खंडूजीः—मी येऊं तर?

शाहीरः—खुशाल या. तुमच्या मसलतीप्रमाणें लागतांच त्या उद्योगाला.

खंडूजीः—हुशारीनें रहा बरें. [ जातात.

---

# प्रवेश तिसरा

[स्थळ—रायगडानजीकच्या दरींतील एक मंदिर. चंद्रावळ शीलेवर डोकें ठेवून बसली आहे. जवळच खाशाबा उभा आहे.]

खाशाबाः—फाटक्या तब्येतीचीं माणसें मनांत भरतच नाहींत कीं काय पोरीसोरींच्या? हो, असेंच दिसतें! नाहींतर ह्या चंद्रावळीसारख्या तरण्याताठ्या पोरीचें मन वळवायच्या करामतीवर, कब्जीकडून नेमणूकच होती ना माझी! माझ्या खट्याळपणाला जरा खुपसुरतीची जोड मिळायला पाहिजे होती, काय बहार झाली असती! बोलबोल म्हणतां कब्जीला धाब्यावर बसवून चंद्रावळीला भुरळ घातली असती. पण कुठें ढिल्या नशिबानें गोता खाल्ला आणि असा वक्रतुंड निपजलों! चेहऱ्यामोहऱ्याची घडणच अशी कांहीं नागमोडी घडली गेली, कीं पैजेचा विडा उचलून आली तर कसबिणीची छाती नाहीं माझें वांकडें पाऊल पाडायची! लग्नाच्या बायकोला बघवत नाहीं चेहऱ्याकडे तर! आईबापांनीं पाळण्याला बाशिंग बांधून बारशांतच लगीन उरकून घेतलें, म्हणून घरांत बाईल नांदत्येय! नाहींतर हा खुपसुरती खाशाबा पुनर्जन्मापर्यंत मुंजाबाच राहायचा! बायकांना म्हणून कसें तें बघवत नाहीं थोबाडाकडे! ह्या चंद्रावळीचाच दाखला येतोयना तूर्तला! एकदोन मितीच्या अंतरानें आतां महिना भरत आला. खुराड्यांतल्या कबुतरागत आम्ही दोघेंच दरींतल्या ह्या खलबतखान्यांत राहतों आहों, पण एकदां तरी ह्या कारटीनें मला डोळे भरून बघायचें होतें! अशांत आणि त्या सर्जाबाचा एक कहार! [आंतून सर्जाबाः—खाशाबा! अहो खाशाबा!] आलाच वाटतें! कब्जीनें शाहिराच्या ह्या चंद्रावळीला इथें आणायची खोटी, हा बुड्ढा जांबुवंत तरण्यागत करूं लागलाय्! अँहँः! झोंकनोक तर न्याहाळा थेरड्याचा! नवरा सजलाय जसा वरातीला! बढतीची लालूच दाखवून, कब्जीनें मध्यस्तीच्या नाझनी कामावर, हिकमती म्हणून माझी आणि निधड्या छातीचा दांडगा म्हणून पहाऱ्याच्या बंदोबस्तीवर ह्या सर्जाची नेमणूक केली. पण कब्जीसकट ह्या चोरट्या रंगबाजीला चुरशीच्या तिरंगी सामन्याचें रूप येणारसें दिसतें. [सर्जाबा येतो.

सर्जाबा:—काय राजे! केव्हांच्या हरळ्या देतोय. जरा तरी माणुसकी दाखवायची ओ देऊन!

खाशाबा:—उगीच भुताटकीबिताटकी असली तर पंचाईत व्हायची; तीन हांका ऐकल्यावरच ओ द्यावी म्हणत होतों. पण दुसऱ्याच हांकेला तुम्ही दत्त! माणूसच आहांना? नाहीं, तिसरी हांक ऐकली नाहीं म्हणून पुसतों!

सर्जाबा:—तुम्हांला काय दिसतंय्?

खाशाबा:—दिसायला माणूसच दिसतंय् आम्हांला; पण पोटांत पाय असले तर पीडा व्हायची! शिवाय दिसायला माणूस दिसणाऱ्या माणसांत माणुसकी असतेच असें कुठें आहे! नरपशूंची एक जात आहे ना माणसांत?

सर्जाबा:—मग तुमच्या हिशेबी आम्ही—

खाशाबा:—माणूस! एकदम माणूस! तुमची तुम्हांलाच शंका नाहीं ना?

सर्जाबा:—छत्! बिलकुल नाहीं!

खाशाबा:—हो, नसली म्हणजे बरें! बरें, पहारा सोडून कां येणें केलें?

सर्जाबा:—गडावरून जासूद येऊन गेला.

खाशाबा:—काय वर्दी आहे कब्जीची?

सर्जाबा:—अंधार पडल्यावर कांहीं निकडीच्या खलबतापायीं कब्जींची स्वारी येणार आहे इकडे! बरोबर कोणी मातबर माणसें आहेत. तेव्हां खबरदारीचा पहारा आणि भली बरदास्त राखायचा हुकूम आहे.

खाशाबा:—आतांशा या खलबतांत रात्रीच्या रात्रीं उजाडताहेत बघा! घडीभर धरणीला अंग टाकीन म्हटलें, तर फुरसत नाहीं मिळत! गेलाच कीं दीस मावळायला. चला सर्जाबा, बघा जरा डोळा लागला तर! आम्हीही आडवे होतों.

सर्जाबा:—हो, हो! आल्यासारखा दोन शब्द बोलतों हिच्याशीं आणि लागतोंच वाटेला.

खाशाबा:—पण तुम्हांला वाटेला लावल्याशिवाय आम्हाला कुठली सुखाची झोंप यायला! या, रामराम.

सर्जाबा:—पण हो, हो! येवढी काय लगीनघाई चालल्येय!

खाशाबाः—तुम्ही नवरीशींच लगट करायला निघालांत मग लगीनघाईशिवाय कसें निभावेल !

सर्जाबाः—पण बोललों जरा तिच्याशीं तर मी काय खात नाहीं ना तिला ?

खाशाबाः—त्याचा काय नेम ! मुक्यामुक्यानेंच चट्टामट्टा उडविणारे तुम्ही ! ह्या नादानें तुम्हीं काय खायचें बाकी ठेवलंय आजवर ? आतां उतारवयांत तरी हरी हरी करा, जा.

सर्जाबाः—( स्वगत ) अरे सोद्या, मला अशी टांग मारतोयस काय ! पण तुझ्यासारखे कैक बचनाग मी पचवून बसलोंय् ! आतां गेल्याची नुस्ती हूल दाखवून झाडाझुडपाच्या आडोशाला लपावें. हा म्हणतो तसा निजला तर चंद्रावळीशीं लगट करावी आणि नाहींच निजला तर ह्याच्या तंगड्या ह्याच्याच गळ्यांत बांधाव्या. सोदेगिरीशिवाय रंगबाजी होतच नाहीं, मग काय करणार ! ( उघड ) बरें, खाशाबा, घेतों रजा.

खाशाबाः—चला कीं, आम्हीही बाहेर वाऱ्यावर पडतों जरा. [जातात.

चंद्रावळः—भगवंता, नाहीं कारे हा भोग सरत ! किती माझे धिंडवडे होणार आणखी ! भक्तिभावानें देवाजीचा धांवा केला; पण त्यानेंही ह्या पोरक्या पोरीचें गाऱ्हाणें मनावर घेतलें नाहीं. आतां माझ्या शाहिराशिवाय मी जीव जगवूं तरी कसल्या आशेवर ? सख्या शाहिरा ! तुझ्या जिवंत वाणीनें सगळ्या दख्खनची शिपाईगिरी जोमाला लावलीस त्या तुझ्या रसवंतीला जर घरधनिणीची शोभा संभाळतां आली नाहीं, तर सरस्वतीचा कोप होईल ना ! रामाशिवाय सीता, नळावांचून दमयंती, तशी मी शाहिरावेगळी चंद्रावळ आशेच्या बळानें जीव जगविते खरी; पण सीता-दमयंतीचें भाग्य ह्या कपाळकरंटीला लाभेल का ? राजसा, खोटीं गाणीं गाऊन वाणीला उणें आण असें ही चंद्रावळ स्वप्नांतही सांगणार नाहीं. पण तुझ्याशिवाय जीव तळमळतो, ऊर भरून येतो, अश्रू आंवरतच नाहींत; त्याला मी तरी काय करूं !

[ सर्जाबा येतो.

सर्जाबाः—बेटा खाशाबा खरेंच झोंपला बरें का ! आतां झटकन् लगट केली पाहिजे. पण आज तरी मला बधेल का ही ! इतकी चाळिशी गुदरली इष्काच्या कामांत, ह्या सर्जाला हार कशी ती ठावी नाहीं. मी मी म्हणणाऱ्या

रावांची ऐनेआरास लुटली. सोबतीशिवाय पोरींना पानोठा वर्ज झाला. वाटेनें निघालों, कीं सासुरवाशीण कांहीं दारीं ठरत नाहीं. पण शाहिराच्या ह्या चंद्रावळीवर कांहीं माझ्या करामतीचा पगडा बसत नाहीं. तरणाताठा जीव, त्यांतून कैदेंत कोंडलेला, राजीखुषीनें ह्या पहारेकऱ्याशीं रंगून जाईल असें धोरण होतें. पण हिनें तर सीता-सावित्रीचा ढंग आणलाय! आजवर घे-घेरून नजरा रोखल्या; बळं-बळंच अंगलट करून बघितली, रंगाढंगाच्या लावण्या तर सदाच गुणगुणतोय्! रसाळपणानें आशुक-माशुकांच्या कहाण्याही सांगून बघतोय्; पण हिची कळी कांहीं खुलत नाहीं. ही तरुणपणांत म्हातारी आणि मी म्हातारपणांत तरणा! असें हे उलटें त्रांगडें झालंय्! बरें, धाकदपटशा दाखवीन तर तो खाशाबा कब्जीपर्यंत बोंब करायचा. आम्हां दोघांच्या जिगरदोस्तींत ही इष्काची तेढ पडल्यापासून विस्तव कांहीं मधून जात नाहीं. पण दिरंगाई नाहीं लागी. बाहेर त्या गुलामाला जाग आली तर सगळाच बाजार उलगायचा. [ चंद्रावळीकडे पाहून जरा खाकरतो खोकरतो.] घ्या, ढीम नाहीं! [ पुनः खाकरतो ] आतां ही रडकी रखमाई खुलायची तरी कशी! चंद्रावळ, अग चंद्रावळ!

चंद्रावळः—कोण हांक मारतंय् ह्या अभागिनीला!

सर्जाबाः—( स्वगत ) अॅ हॅ हॅ हॅ! हंसली बिसलीस तर तुझ्या आईची शपथ आहे बघ. हं रड, रड! कोण हांक मारतंय् अभागिनीला! जशी काय घरघर लागल्येय घशाला! नाकाशीं सूत धरलंय् हिच्या! ( उघड ) तुझा सोबती! मी सर्जाबा अलोंय चंद्रा!

चंद्रावळः—आलास बाबा! बदफैल्यांचा राजा तूं. तुझी कशी गैरहजिरी लागेल इथें! पण पतीच्या शाहिरीवरचा उतारा तुझ्यासारख्या समंधासाठीं नाहीं बरें.

सर्जाबाः—चंद्रा, किती दिवस आतां अशी पांखरागत झुरणी घेणार तूं? साधेल तें साधून घ्यायची जवानी वायां जातेना जीवा अशानें! माझ्यासारखा जिवाचा संवगडी तुला—

चंद्रावळः—सर्जाबा, हजारदां सांगितलें, कीं माझी मी बळकट आहे दुःखाला म्हणून! मग पहारा सोडून कां येत असतां रोज रोज छळायला!

सर्जाबाः—(स्वगत) साजणी, तुझ्या नादानें पहाराच काय; लाजही सोडून बसलोय्. आणि इरेलाच पडलों तर रंगबाजीच्या सामन्यांत जीव सोडीन; बेहेत्तर आहे जीव गेला तर! पण शोक पुरा झाला पाहिजे. (उघड) चंद्रा, तूं येऊं नको म्हणालीस म्हणून माझा जीव राहील का? तूं अशी उदासवाणी सुस्कारे सोडीत बसलेली दिसलीस म्हणजे माझ्या पोटांत कसें कालवल्यागत होतें. एकाएकीं घरधनिणीची याद येते, नि तुझ्या गळ्यांत गळा घालून रडावेंसें वाटतें बरें!

चंद्रावळः—होय बरें सर्जाबा. मुलींचा तोंडवळा कुठें कुठें असतो आई-सारखा! तुम्ही मला वडलांसारखे आहां!

सर्जाबाः—छे, छे, छे! असें म्हणून भागायचें नाहीं बरें पोरी! अग, अशानें का कुठें हौशी पुरल्या आहेत मनमागत्या!

चंद्रावळः—मनमागत्या हौशी कसल्या? आणि भागायचें काय नाहीं सर्जाबा?

सर्जाबाः—हं, हं, हं! भाबडीरें भाबडी पोर! इतकेंही उमगलें नाहीं! फुकट, फुकट एवढी तरणीताठी-साजरीगोजरी झालीस! कशाला फुलली मग ही प्रीतीची फुलवंती? काय करायची ही नवी नवती? मग आम्ही झालीं सवरलेलीं माणसें बरीं कीं! आतां आम्हांलाच तुला सगळें कांहीं शिकवावें लागणार. माणसांत मूळचेंच तसें कांहीं तरी लागतें, हेंच खरें!

चंद्रावळः—सर्जाबा! काय बडबडतां तुम्ही? तुमच्या बेलगामी बोलीचा रोंख नाहीं समजलें मी?

सर्जाबाः—हें हें उगीच ओढून चंद्रबळ आणतेस हं! हें तुझें बोलणें उगीच. आतां खरें सांग, समजलीस कीं नाहीं माझ्या मनांतली गंमत? नाहींतर इतकें कशाला, तूं तरी माझ्या गळ्यावर हात मारून सांग माझ्या मनांतली गंमत नाहीं ओळखली म्हणून? नाहींतर आपण तुझ्या गळ्यावर हात ठेवायला तयार आहों! आहे कबूल?

चंद्रावळः—माझ्या गळ्यावर हात ठेवायला तुम्ही तयार आहां, हें मी कधींची जाणतें. सर्जाबा, उतारवयापर्यंत वयाची एवढी उतरंड मांडलीत, पण शुद्ध एरंड वाढलांत. चार पायांच्या पशूची गांठ पडली तर दुगाण्या चुकवतां येतात. पण दोन-पायांच्या गाढव माणसाची गांठ पडली—

सर्जाबाः—अग, पण हो हो ! हो हो ! अशी ~~कल्पनीमत~~ बेफाम दवडूं नको ! सबूरीनें घे. तुझ्यासारख्या छेलछबेल्यांनीं लाडेलाडे गोंजारून रंग-ढंगाच्या पकडींत पकडलें तर आम्ही रंगेल सूत असतों, नाहीं तर भुता-सारखे मानगुटीला बसतों बरें ! आमच्या पहाऱ्यांत आहेस. जिवाची उगीच बेजारगत करून घेऊं नको.

चंद्रावळः—सर्जाबा ! कशाला उगीच पाहऱ्याचा भाक घालतां ? दशपिंडीला उपयोगीं पडेल म्हणून कावळ्याला का कोणी जवळ करतात ? बत्तीस दातांच्या पकडींत जीभ शाबूत राहते, पण जीभ तेढी गेली तर बत्तिशी पार पडायला वेळ नसतो, हें तुम्ही मात्र ध्यानांत धरा.

[ खाशाबा येतो.

खाशाबाः—( स्वगत ) अरे सोद्या, गेल्याची हूल दाखवून मागल्या ओढीनें असा आलास काय सांवळागोंधळ घालायला ! पण याद राख, माझ्या पहाऱ्यांत येऊन माझीच शिकार पचवितांना तुला बरीक काळाच्या पचनीं पडावें लागेल ! भला गवसलाय् गडी एकटा कचाट्यांत माझ्या ! एकदां चांगला रिंगणावर धरल्याशिवाय हा कायमचा टळायचा नाहीं. (उघड) काय दोस्त ! कसली गडबड चालवली आहेस ?

सर्जाबाः—( स्वगत ) खट्याळ माणून आलाच कीं अखेरीला आंत !

खाशाबाः—कां ? अशी तसबीर कां लपवितां ? कुंडली जुळत नाहीं वाटतें ! ग्रह जरा म्हातारे पडलेत कां ?

सर्जाबाः—( उघड ) खाशाबा, उठलांत वाटतें ?

खाशाबाः—मग ? आम्हांला काळझोंप लागलीसें समजून, तुम्ही पुढच्या तयारीची कुजबूज करीत होतात वाटतें ! कीं झोंपेंतच मी अशी उभी लोळण घेत आलोंयसें तुम्ही समजतां इथवर ?

सर्जाबाः—छे, छे ! तसें कांहीं नाहीं. तुम्हाला बाहेर जरा डोळा लागला होता—

खाशाबाः—तोंवर इथें डोळा लागतोय् का बघत होतात तुम्ही ? नामी ! छान् !

सर्जाबाः—खाशाबा ! काय बरळतां हें ? आतां आमचे दिवस का उरलेत ते !

खाशाबाः—मग नुसत्या रात्रीच राहिल्यात वाटतें ? प्रसंगानें माणसाला रात्रीचा दिवस करावा लागतो, तसे तुम्ही दिवसाची रात्र करतांय् वाटतें अशी ?

सर्जोबाः—काय बरळतां राजे ! तुमचें तुम्हांलाच शोभू जाणे. आम्ही जरा नादीं झालों म्हणून ह्या वयांत अगदींच हे नाहीं बनलों. कुणाही परस्त्रीकडे वांकड्या नजरेनें बघायचें नाहीं असें अलीकडे आम्हीं ठरवलंय् !

खाशाबाः—मग आतांगत आपपरभाव विसरून, सरळ मिठीमिठी म्हणतां ? तरीच तुम्ही बेछुटपणानें इथें बुड्ढी घोडी अशी लाल लगाम करूं बघत होतात बरें का ?

सर्जोबाः—खाशाबा, अजून तरी थोबाडाला जरा गवसणी घालाल का ? कब्जीच्या मर्जीतले तुम्ही ! म्हणून मघांपासून गय केली, पण आणखी आतां काळजाला हात घालशील तर—

खाशाबाः—अहो, तुम्हांला कुठलें आलंय् राया काळीज ! असलेंच तर निदान तें उलटें असेल.

सर्जोबाः—खाशाबा, फिरून एकदां बजावतों. फारच भडकत चाललांत बरें.

खाशाबाः—भडकत चाललांत ? अरे सोद्या, तिळपापड झाला आहे माझा. दगाबाज !

सर्जोबाः—मुर्दाडा, आतां शब्द तरी वांकडा काढ ! मुंडी मुरगळतों.

खाशाबाः—अॅ हॅ ! अॅ हॅ ! मला काय कोंबडें कबूतर समजतोस वाटतें चार गंड्याचें ? तुझ्यासारख्या कुत्र्यामांजराकडून मुंडी मुरगळून घ्यायला ? मींही चार आखाडे पाहिलेत. आडवे उभे दोन पवित्रे जाणतों. खुमखुमीच असली तर ये कीं असा मैदानांत !

सर्जोबाः—अरे जा ! तुझ्याशीं काय लढायचें मुडद्या ! बघेबघेतों नरडीचा घोंट घेईन !

खाशाबाः—तर ! तर ! मोठा संभाजीमहाराज लागून गेलास ना नरडीचा घोंट घ्यायला !

सर्जोबाः—संभाजीमहाराज लागून गेलास ? अरे, खरोखरच नरडीचा घोंट घेतला असता, पण काय करूं, उपास पडला मला आज.

खाशाबाः—मग उपासाला परस्त्री चालते वाटतें ? त्यांतून ही तर जरूर चालणार, (कोंवळी कांकडी आहेना !)

सर्जाबाः—काय मुजोर अवलाद आहे !

खाशाबाः—काय दोस्त ! अशा कवड्या विचकून थक्क काय झालांत? या असे कुस्तीला ! दमांत उखडून टाकतों. पकडीगणीक एकेक जीव घेऊन तुमच्या पंचप्राणांचा गट्टाच खलास करून टाकतों. या असे मैदानांत ! आमच्या मढ्या तब्येतीवर जाऊं नका बरें. मुलतानमातींत कमावलेली कांब आहे कांब पोलादाची.

सर्जाबाः—( स्वगत ) आतां असा नाहीं निभाव लागायचा ! ह्या खलबतखान्यांतच ह्याला फटकावला तर तो कब्जी माझा जीव काढील. आतांची वेळ कशीतरी मारून नेऊन उद्यां उघड्यावरच गुपचूप बार उडविला पाहिजे.

खाशाबाः—अरे शुंभा, असें चंबूसारखें तोंड करून काय उभा आहेस ? डरली वाटतें ?

सर्जाबाः—[ रुसव्यानें ] बस्, बस् ! बस्स् करा ! तुम्ही इतके असालशी अटकळ नव्हती आम्हांला. आमच्या तोंडांत घ्यायला कुणी नव्हतें म्हणून तुमची दोस्ती केली ! बरें, येतो रामराम !

खाशाबाः—( स्वगत ) अरे बिलंदर, आतां असा पोटांत शिरायला बघतोस काय ? ठीक आहे. आपणही वरवर गोंजरल्यागत करून ठेवावें. नाहींतर उद्यां उघड्यावर मला बदडायला चुकवायचा नाहीं हा ! ( उघड ). काय दोस्त ! अरे मित्रा, खरेंच रागावलास कांरे ? हा ढिल्या ! अरे, मस्करी ती सगळी !

सर्जाबाः—बस् ! बस् करा ! समजली, समजली तुमची दोस्ती ! आम्ही समजतों, कीं कब्जीच्या ह्या गुप्त खलबतखान्यांतले आपण दोघेही; बड्या जोखमीनें अशा दरीखोरींत राहणें. दोन दोन महिन्यांत गांवकऱ्यांची गांठ ना भेट ! या वनवासांत खाशाबाला आम्ही आणि आम्हांला खाशाबा कायते जिवाचे दोस्त ! पण खाशाबा म्हणजे काय; ताठ उताणे चालणार ! चालणार तर चाल बाबा ! हा मी चाललों, रामराम !

खाशाबाः—समजलों, समजलों ! तुम्ही सुद्धां थट्टेंत असे होळीसारखे

भडकाल हें आम्हांलाही ठाऊक नव्हतें. आम्ही म्हणतों, कीं त्या चंद्रावळीवर कब्जीचा डोळा आहे; तेव्हां सर्जाबांनीं तिच्याशीं लगट करूं नये; फुकटांत जीव जायचा सगळ्यांचा. पण सर्जाबा म्हणजे काय ? लग्नाला झालेला पोरगा, त्याला कुठला दम निघायला ! तिनतीनदां तिच्या तिथें मरतोय्. तूं मोप मरशील; पण आम्हांला अजून जगायचें आहे ना ? या, रामराम !

**सर्जाबाः**—कब्जी काय पहाऱ्याला बसलाय् वाटतें तिच्यावर ?

**खाशाबाः**—पण कुण्यावेळीं येईल हें तुझ्यामाझ्या बापाला तरी उमगेल का ? हवें तेव्हां तिला भेटतां यावें म्हणून तर अशा खलबतखान्यांत आणून ठेवलें आहे त्यानें.

**सर्जाबाः**—कांहीं म्हणा राया ! मनीं मत्सर दाटल्याशिवाय त्या पोरीच्या सलगीची तंगी नाहीं चालवलीत आम्हांला. नाहींतर आपला तर होरा वाहतोय, कीं कब्जीला मागमूसही लागायचा नाहीं याचा.

**खाशाबाः**—आणि चंद्रावळीने गाऱ्हाणें केलें म्हणजे मग ? येईल का डोळे पांढरे पडायची वेळ !

**सर्जाबाः**—बच्चा आहेस इष्काच्या कामांत तूं ! अरे, ती बदफैली असेल तर वशच होईल, आणि पतिव्रता असेल तर परपुरुषाजवळ आपला फाजीलपणा सांगणारच नाहीं. तें कांही नाहीं, खाशाबा ! तिच्या सलगीची सवलत आम्हांला द्यायलाच पाहिजे तुम्हीं !

**खाशाबाः**—अन् मरेनास लेका तूं. कुटणेगिरी शिकवतो मला ? शरम नाहींरे वाटत ? बस्स् ! सर्जाबा, माझ्या पहाऱ्यांत असला फाजीलपणा मला बिलकुल खपायचा नाहीं. खालच्या टेकडीवर टेहळ्याचा तुझा पहारा ! तिथें लागेल तें कर जा.

**सर्जाबाः**—खाशा, खाशा, बरें नाहींरे ! इतक्या दिवसांची कांहीं दोस्ती ध्यानांत घे.

**खाशाबाः**—अरे जारे, मला दम देतोय !

**सर्जाबाः**—बरें आहे राया, मीही सर्जा आहे नांवाचा ! लवकरच तुला हिस्का दाखवितों. [ सर्जाबा जातो.

**खाशाबाः**—अरे जा ! चीड चीड चिडला तरी तुझ्यासारखा नायटा काय करणार माझें ? आतां जरा जिवांत जीव आला ! जिवाचा

धडा करून तोंडाला येईल तें बोलत होतों खरा; पण काळीज कसें धाड् धाड् धाड् धडक्या घेत होतें. वाटलें, हें पोटांतच राहतंय, कीं जातंय कुठें सरकून! पण नाहीं, बायकोचंच कुंकूं सबळ म्हणून हा अपमृत्यु टळला बरें खाशाबा! नाहींतर मघांच तुम्हीं राम म्हटलें असतें. पण छे! मनाला थोडी रुखरूख आहेच. शेंपटावर पाय दिलाय, हा साप आतां डूक धरल्याशिवाय राहणार नाहीं; कब्जीला ही भानगड सांगावी तर हा सर्जा, आमचाही फाजीलपणा कब्जीला सांगणार, आणि ही चंद्रावळ साक्ष भरणार! तिला काय सहजासहर्जी दोन्ही कांटे निघाले तर बरेंच झालें. आम्हां माकडांच्या भांडणांत हा लोण्याचा गोळा कब्जीसारख्या बोक्याच्या घशांत अचुक उतरणार असें दिसतंय्. काय करावें बुवा ह्या भानगडीला!

[ एक कातकरी तीरकमठा सरसावीत धांवत येतो.

**कातकरी**:—वाघरूरे, वाघरूरे, वाघरू-ओ-हो-हो-हुर्रर्र-हुर्रर्र-हुर्रर्र—

**खाशाबा**:—अरे बाप! हा कोण खवीस आला आणखी! मला आज कुस्त्या मारायच्या आहेत तरी किती? मघांच्या झगड्यांत मुजोरीनें जगतां आलें. पण ह्या काळभैरवाच्या झपाट्यांत कपाळमोक्ष होणारसें दिसतंय्! तीरकमठा सरसावून हा बघतच राहिलाय कीं! सर्जेरावानें मारेकरी तर नाहींना घातला? का थडग्यांतून समंधच आलाय एखादा उठून! पण गांगरून नाहीं कामाचें! बेडर सवाल केला पाहिजे. (उघड) कोण आहेस तूं?

**कातकरी**:—मनुक्ष!

**खाशाबा**:—यंव्! छान जाब दिलास! तुझ्या खपसुरतीनें पंचाईत पडली होती बघ मला! पण सांगितलेंस हें खरें ना? नाहीं तर फिरून जाब दे. तूं मुंजा, खवीस, समंध, वेताळ, आग्यावेताळ कुणीही असलास तरी फिकीर नाहीं. खुराक मागून घे; आणि माणूसच असलास, तर उणें अधिक बोलल्याचा राग मानूं नको. बाकी ऐन्यांत कधीं छबी न्याहाळली असलीस तुझी तर तुला रागच येणार नाहीं म्हणा. मग काय? कोण आपण?

**कातकरी**:—मनुक्षच!

**खाशाबा**:—मनुक्षच! खरें कशावरून? म्हण बघूं राम!

**कातकरी**:—राम! हायना शिपाईदादा माणूस?

**खाशाबा**:—हं! तुला दोनच पाय आहेत, शिंगंही कुठें दिसत नाहींत,

का फुटायचीं आहेत रे अजून ? शेपूट—शेपूटही दिसत नाहीं, तेव्हां माणूस म्हणायला हरकत नाहीं, पण डुकरासारखा मुसंडी मारीत गुहेंत शिरलास; तेव्हां तुला माणुसकी तरी नसली पाहिजे. नरपशू ! दिवेलावणीला बिनहुकमी कां आलास आंत ?

कातकरीः—हाथ, शिकार आलीया नव्हे माझी.

खाशाबाः—अरे, ह्या भुयारांत शिकार आहे तरी कुणाकुणाची ? आतांपर्यंत कब्जी, मी आणि सर्जा तिघे हक्कदार होतोंच. चवथा हा रानदांडगा आलाच आहे. मूळ शाहिराला जमेस धरला नाहींच. आतां ही जमाबंदी फुगणार तरी किती ? पण आधीं नीट खात्री पटवून घ्यावी. बरें, तुझ्या शिकारीची जात सांग बघूं रे ?

कातकरीः—वाघ.

खाशाबाः—(स्वगत) ती तरी एक वाघीणच आहे. (उघड) नर का मादी?

कातकरीः—मादी. वाघीण आहे शिपाईदादा.

खाशाबाः—अरे, खरोखरीची वाघीण कीं, एखाद्या पांखराला वाघीण म्हणतोयस् ?

कातकरीः—लई खोडीळपना क्येलास तर गोपनीनें टकुरंच फोडीन बघ ! शिपुड्या ! म्यां हेंगाडा नव्ह वाघणीला पांखरूं म्हंगाया !

खाशाबाः—बिथरलें काम ! आतां नाहीं आमची धडगत ! उगीच छेडलें या अरिष्टाला. अरे बापरे ! लेकाच्या शेंदरी डोळ्यांनींच माझें धाबें दणाणतंय्. बाकी असल्या एखाद्या यमदूताची जर का दोस्ती जमली तर सर्जासारख्या काळपुळीचा पक्का बंदोबस्त होणार आहे. शिवाय असल्या हेंगाड्याला इथें ठेवल्यानें कांहीं दगाफटकाही होण्याची धास्ती नाहीं. बघूंच का ह्याला विचारून ? हो, पण तो बेटा सर्जा गेला कीं नाहीं तें नीट पाहून यावें; नाहींतर जगण्याच्या धडपडींत मरणालाच आमंत्रण व्हायचें ! हें बघ दोस्ता, मला तुझ्याशीं कांहीं गोष्ट करायची आहे. जरा थांब; मी आलोंच. [ खाशाबा जातो.

कातकरीः—चंद्रावळ, चंद्रावळ ! [ चंद्रावळ येते.

चंद्रावळः—कोण बाबा तूं ?

कातकरीः—चूप, मोठ्यानें बोलूं नको !

चंद्रावळः—म्हणजे तूं आहेस तरी कोण ?

कातकरीः—तुझा शाहीर ! [ कातकऱ्याचा वेष टाकतो.

चंद्रावळः—माझा शाहीर–माझ्या जिवाचा जिवलग ?

शाहीरः—चूप बोलूं नको ! कलुषा कब्जी इथें आला होता का दोन दिवसांत ?

चंद्रावळः—नुस्ता आला होता नव्हे, गणोजी शिर्क्यांशीं त्याचें खलबत चालूं आहे इथें !

शाहीरः—खंडोजीचा तर्क निखालस खरा ठरला ! अरे बेरडा !

चंद्रावळः—आजसुद्धां येणार आहे इतक्यांत.

शाहीरः—काय ? आतां येणार आहे ? पण खाशा आलाच वाटतें ! जा, जा तूं.

[ चंद्रावळ जाते. शाहीर पुनः पहिला वेष घेतो. खाशेराव येतो.]

खाशाबाः—( स्वगत ) अगदीं कोल्ह्याचें तोंड बघितल्यासारख्या गोष्टी जुळून येत आहेत. नशीबानें चांगलीच टिकी धरली म्हणायची आज ! सर्जा तर चालता झालाच. आतां एकदां हें जंगलखातें ओळखीचें करून घेतलें, कीं आपल्या शिकारीचा पाठपुरावा करायला बिनघोर झालों. हा रानदांडगा माणसाळलेला दिसत नाहीं, हेंही ठीक आहे. असलीं जंगली माणसें इमानाला बडी शाबूत असतात. ( उघड ) मग काय गड्या, गेला का तुझा घुस्सा ? कीं कोंबडबिंबड उतरून टाकूं ! हें बघ, असा टवकारून बघूं नकोस. मी जिभेचा जरा बेसुमार माणूस आहे. बाकी काय बडबड करीन तेवढीच हं. पोटांत म्हणशील तर भलतेंसलतें कांहीं रहावयाचें नाहीं.

कातकरीः—व्हय, व्हय, शिपाईदादा ! आमास्नी काय उमगत न्हाई व्हय वंगाळ वाईट ? म्यां जसा शिकारीस्नी हमखास मारतूया तसें माणूसबी आदरून हेरतूया. तुमासनी नामी हेरलें कीं न्हाई ? हँ हँ हँ.

खाशाबाः—अगदीं बरोबर बुवा–हँ, हँ, हँ ! काय आभाळ गडगडल्यासारखा हासतोय् लेकाचा ! खूप तब्येत आहे; अगदीं अशांतच बार उरकला पाहिजे. कायरे, पहारेकऱ्याच्या कचाट्यांतून इथवर कसा आलास बिनहरकत ? तुला कुणींच कसें बघितलें नाहीं ?

**कातकरीः**—अँ! आव, म्या कशाला गेलुया पारान्‌बिरा बगाया! ह्या ह्या वरच्या दरडीनें घसरलुया नव्ह कां दोरानें शिकार धुंडीत!

**खाशाबाः**—ह्या ह्या कड्यावरनें? भलेबहाद्दर! रायगडीं आलेली हिरा गवळण रात्रीं बुरूज उतरून गेली म्हणून त्या बुरुजाला शिवाजीमहाराजांनीं हिरकणी बुरूज असें नांव दिलें; तूं असला अस्मानकडा उतरून इथवर मुसंडी मारलीस. बस्स, आपण डुक्करकडा हें नांव देणार ह्या कड्याला! वाहवा! तुझी ओळख झाली नामी झालें बघ!

**कातकरीः**—नामी म्हजी, लई नामी झालंन्‌ काय!

**खाशाबाः**—तुझें नांव कायरे?

**कातकरीः**—गोम्या!

**खाशाबाः**—बरें, तुला कांहीं ठावठिकाणा आहे, कीं माकडासारखें कुठेंही रहाणें?

**कातकरीः**—तसं कशापायीं? शिवाईच्या दरीला र्‍हातों मी. शिकारीपायीं ह्यो पल्ला गांठला!

**खाशाबाः**—बरें, कांहीं आगापिछा आहे का? कीं अहलक खाका?

**कातकरीः**—म्या येकटा जीव हाय बगा!

**खाशाबाः**—दोस्ता, आपली तर मर्जी बसली बघ तुझ्यावर, राहशील कारे इथें?

**कातकरीः**—अँ! का र्‍हाइ र्‍हानार, आदरून र्‍हातू. लई ग्वाड बोल्लासा बगा. आईच्यान्‌ र्‍हातू! अंबाबाईच्यान्‌ र्‍हातू. [पडद्यांत-जय अंबिके!]

**खाशाबाः**—अरे! इतक्यांत कब्जी आला! आतां मात्र आली पंचाईत. करायला गेलों काय आणि झालें काय! जर का ह्या कातकर्‍याला त्यानें बघितला इथें, तर इथल्याइथें जीव घेईल तो माझा. बायकांच्या नादानें संकटें येतात हीं अशीं! आतां काय करावें ह्या बट्ट्याबोळाला! [**कब्जीः**-जय अंबिके!] हें बघरे दोस्ता! पळ, पळ जसा आलास तसा! मग भेट मला म्हणजे सांगेन तुला सगळें.

**कातकरीः**—अं! अवराव, पलाया वाव तरी व्होवा नव्ह?

**खाशाबाः**—ह्या ह्या वाटेनें ठोक धूम.

**कातकरीः**—म्हणजे त्या पहारेकर्‍याच्या कचाट्यांत गवसूं व्हय?

खाशाबाः—नाहींतर आलास त्या दोरखंडानें दरडी चढून जा; जा जलदी.

कातकरीः—नाहीं र बा ! आपल्या बाऱ्यानेंबी चढनं व्हनार नाई त्यो कडा. अपुन तर हतच ठिया लगावनार बगा. [ कञ्जीः–जय अंबिके !

खाशाबाः—चांडाळा ! तो कोकलतोयना ! निदान या भगदाडांत तरी लपून बैस. त्या त्या दगडाआड गुपचूप पडून रहा; भले शाबास ! अगदीं हूं का चूं करूं नको हं ! [पडद्यांत–जय अंबिके !] जय भवानी ! [पडद्यांत–जय महिषासुरमर्दिनी !] जय अंबिके ! [पडद्यांत–जय अंबिके !]

[ खाशाबा भुयाराची शीळा सरकवतो. नखशिखांत काळा बुरखा, हातांत मशाल असा कलुषा बाहेर येतो.]

कलुषाः—जगदंब, जगदंब, जगदंब ! खाशाबा !

खाशाबाः—जी !

कलुषाः—कांहीं खबर ?

खाशाबाः—कांहीं नवलविशेष नाहीं महाराज !

कलुषाः—त्या पोरीची नाहींना तब्येत लागत आमच्यावर ?

खाशाबाः—जी, चंद्रावळीची ? छे, छे, छत्तीसाचा आंकडा. नांव काढायची खोटी, शब्दसुद्धां बोलत नाहीं.

कलुषाः—न बोलूं दे ! खुराक चालू झाला म्हणजे फुटेल कंठ तिला ! कोंडमाऱ्यानें मुक्या मैनेला लटपटपंची सुचते. मग बोलक्या पांखराचा काय पाड ! बरें, शिर्क्यांची काय वर्दी आहे ?

खाशाबाः—वर्दी मुळींच आली नाहीं.

कलुषाः—नाहीं ? मोगलाचा हुजऱ्या–हलकाऱ्या कुणी फिरकला नाहीं ह्या चोरवाटेनें ? नवल आहे ! वचनाचा सच्चा गणोजी कुठें अडला तरं नाहीं दग्याफटक्याने ? टेहळणींत कुठें ढिलाई तर नव्हती खाशाबा ?

खाशाबाः—छे, छे !

कलुषाः—मग दिरंगाई कां बरें व्हावी त्यांच्याकडून ? माझ्या फितुरीची शंका तर नाहीं घेतली गणोजींनीं ? जहागिरीच्या लोभानें संभाजीला मोगलांच्या सुपूर्त करीतों घडीघडीनें घोर दुणावतच जाणार



गणोजी: — बेजबाबदार भोंसलेशाहीला दिवसा ढवळ्या आग लावायला तयार झालेला गणोजी शिर्के !

का माझा? मराठेशाही उलथून पाडण्याकरितां उलट्या काळजानें मृत्यूच्या सरहद्दीवर पाय रोंवल्यावर शिर्क्यांसारख्या तडफेच्या सरदाराच्या दिरंगाईनें काळजाचा कसा ठाव सुटतो! दख्खनच्या बेबंदशाहीचें बियाणें, सजाच्या बदफैलीचा सूत्रधार, असा माझ्या नांवाचा धादांत डांगोरा पिटला जात असतां, लगीनघाईनें हें फितुरीचें कारस्थान उरकलें नाहीं, तर तो चिटणिसाचा खंड्या उद्यां माझ्या मिशांना कांदे बांधील. [ पडद्यांत—जय अंबिके! ] हे आले गणोजी! जय भवानी! [ पडद्यांत—जय महिषासुरमर्दिनी! ] जय अंबिके! [ पडद्यांत—जय अंबिके! ]

[ खाशाबा शिळा सरकावितो. काळे बुरखे पांघरलेले दोन इसम येतात.]

**कलुषा:**—कोण?

**गणोजी:**—संभाजीचा कर्दनकाळ! बेजबाबदार भोंसलेशाहीला दिवसाढवळ्या आग लावायला तयार झालेला गणोजी शिर्के!

**कलुषा:**—हं, हं, शिर्के, शिर्के, सबुरीनें घ्या! हा तुमचा तडाखा मोठा जबर बुवा! अहो, आम्हीतरी कुठें त्या भोंसल्यावर छत्रचामरें ढाळायला सजलों आहों? ही मराठेशाही कशी उलथून पडेल ही विवंचना सगळ्यांनाच आहे. मग तुम्हीच का उगीच भीमबळानें शिरा ताणतां?

**गणोजी:**—शिरा कां ताणतां? काय सांगावें कब्जी! आग, आग भडकली आहे मस्तकांत! पेटलें आहे सगळें! ह्या संभ्यानें माझ्या मातबर घराण्याची बेचिराखी उडवलेली ह्याच देहीं, ह्याच डोळां पाहिल्यावर माझा तळतळाट झाल्याविना कसा राहील? हत्तीहत्तीसारख्या माझ्या भावाबंदांची कबंधं 'सूड' 'शिरकाण सूड' अशा किंकाळ्या फोडीत सभोंवतीं नाचूं लागलीं म्हणजे मी वेडापिसा होतों बरें! जनानखान्यांत पाऊल पडायची खोटी, शिर्क्यांच्या एवढाएवढाल्या तरण्याताठ्या लेकीसुना, पांढऱ्या फटफटीत कपाळानें ऊर बडवीत सामोऱ्या धांवल्या, कीं जीव गुदमरतो, ही ही ही टाळू ताडकन् फुटून जाईलशी धास्ती वाटते; आणि शिरा कां ताणतां म्हणतां?

**कलुषा:**—छे, छे. राजे, गैरसमजूत झाली आपली! आपलें खानदानी घराणें देशोधडीला लागलें, साजरींगोजरीं मुलेंबाळें कत्तलीला बळीं पडलीं, तिन्हीसांजेला दिवा लावायचा म्हटलें तरी माणूस नाहीं राहिलें वाड्यांत,

हें निराळें सांगणें नको. तसेंच शिरकाणाबाबत गणोजी शिर्क्यांनीं भोंसल्यांचा निर्वंश करून सूड उगवला नाहीं, तर शहाण्णव कुळींच्या शिर्के घराण्यांत पुरुषच उरला नाहीं असें आम्हीच उद्यां म्हणूं. पण करणें तें खबरदारीनें करा, पोटांत दुःखाचा वडवानळ भडकला असला तरी तोंडावर गंभीर दर्याचें सोंग ठेवा, इतकेंच आमचें म्हणणें. आतांच आरडाओरडा कराल तर ह्या बेबंदशाहीचा शेवट कसा साधेल ?

गणोजीः—एकापरी तुमची ही सल्ला योग्य आहे. ठीक आहे, हें तोंड मिटलें! आधीं भोंसलेशाही पेटवीन आणि मगच फुशारकी मिरवीन, झालें?

कलुषाः—हो, हो! जरूर जरूर पेटवा. आम्ही पाठबळ देऊं! त्या वणव्यांत आम्हां गरिबांचीं कणसें भाजलीं म्हणजे झालें. दुसरें काय? या, बसा असे. खाशाबा, ठेव मशाल बाबा अशी. [खाशा मशाल ठेवतो.] आणि आमच्या मसलती ऐकूं न येतील इतक्या अंतरावर त्या चंद्रावळीला घेऊन जा. [खाशाबा जातो.] जरा उशीर झाला आपल्याला, हे—

गणोजीः—फितुरीबाबत यांची नेमणूक झाल्येय बादशहाकडून. मुकर्रबखान यांचें नांव.

कलुषाः—असें असें, ठीक! मग राजे, काय मनसुबा ठरतोय् बादशहाचा? आम्हीं आमची बाजू खुलासेवार मांडली आहे. मराठ्यांचा राजा संभाजी बिनलढाईनें, बिनसायासानें आम्ही बादशहाच्या सुपूर्त करूं; आणि या फितुरीखातर मेहेनताना कुलपरंपरेनें दहा लाखांची जहागीर दिल्लीप्रांतीं घेऊं. मात्र रायगडाच्या पंचक्रोशींत कांहीं ही मसलत आमच्यानें निभावणार नाहीं. मग फत्ते झाल्यावर अलमगिरांनीं निराळी सरंजामी दिली वाहवा न दिली तरी वाहवा! आम्ही कांहीं नाराजी दाखविणार नाहीं.

गणोजीः—नाहीं नाहीं, फत्ते झाल्यावर काय होईल ही तूर्तची बाब नाहीं. फत्ते झाल्यावर बादशहाची मर्जीच झाली तर अंबारींतूनही मिरवतील तुम्हांला. तेव्हांचें काय सांगावें! तूर्तला संभाजीबाबत दहा लाखांची जहागिरी ही मागणी इनसाबी कां गैरइनसाबी ह्याचा आधीं निवाडा झाला म्हणजे झालें!

कलुषाः—राजे, राजकारणाच्या आखाड्यांत उतरलेलीं माणसें तुम्ही!

आमची ही मागणी बेहिशेबी मानतां ? तुम्ही संभाजीला संभाजीच्या मापानें मोजूं नका. मराठ्यांचा राजा, अशा वजनानें तोला आणि मग बोला.

**गणोजी**:—मराठ्यांचा राजा म्हणून संभाजीला मोल असतें तर तो बिनमोलच झाला असता; आणि संभाजीचें मोल करणाऱ्या जिभेचे ह्या गणोजीनें आधीं तुकडे पाडले असते. पण बेजबाबदारीनें कवडीमोल झालेल्या त्या दारुड्याला आतां राजाच्या मोलानें कोण तोलील ?

**कलुषा**:—संभाजीच्या राजेपणाला मराठेशाहींत मोल नसलें तरी दुनियेच्या पेठेंत तो नालायक ठरला पाहिजेना ? आज आठ नऊ वर्षे औरंगजेबासारख्या बादशहानें ज्याच्याशीं जातीनें झुंज मांडली, कडव्या जातीच्या रोहिले-पठाणांची लाखलाख फौज हल्ल्या फेरहल्ल्यानें कतल खेळत असतां, ज्यानें चौफेर नजर राखून मराठयांची भालाबरची बहादुरीनें नाचवली, त्याच्या मनगटांतली दिल्लीश्वराच्या मनगटाला भिडण्याची रग पहिल्या हल्ल्याइतकीच जिवंत आहे हें विसरूं नका. शिर्के, वेर्जी उतरल्यानें मोतीं मातीमोल होतीं तर गरिबांच्याही घराला मोत्याचा गिलावा चढता ! वेर्जी उतरला तरी मोती तो मोती ! तसा बेजबाबदार झाला तरी राजा तो राजा ! आणि अशा राजाला मृत्यूच्या जबड्यांत लोटायचा म्हणजे दस लाखांच्या जहागिरीची ओवाळणी समजा त्याच्या जिवावरची !

**मुकर्रब**:—आम्ही कांहीं संभाजीला ठार करायला सांगत नाहीं तुम्हांला.

**कलुषा**:—खानसाहेब, जातीच्या शूराला मरण हा मोक्ष असतो; पण अपेशी जगणें, त्याला मेल्याहून मेल्यासारखें होतें ! शिवाय संभाजी एकदां मोगलांचा कैदी ठरल्यावर त्याचें मरण ओढवणारच नाहीं असा तरी काय भरंवसा ? नाहीं, म्हणजे उद्यां तो मेला म्हणून आम्हांला सुतक येतें अशांतला भाग नाहीं; पण आपली बोलायची गोष्ट ! मग काय शिर्के ? हं बोला, बोला झटझट बोलते व्हा !

**गणोजी**:—हें पहा कब्जी, तुम्हीं जशी तुमची बाजू सजवलीत तशी आतां आमची मर्जी ऐका. अलमगीरबादशहांना संभाजीची तहान लागली याचा खुलासा त्यांना दख्खनशाही घशांत उतरवायची आहे असा उघड-उघड आहे, आणि तुम्ही रायगडची पंचक्रोशी वगळून संभाजी आमच्या सुपूर्त

करणार, म्हणजे मोगलांना दख्खनशाही मिळाली असें होत नाहीं. औरंगजेबाला मराठेशाही मिळाली असें तेव्हां होईल, कीं ज्यावेळीं कच्च्याबच्च्यांसुद्धां तमाम भोंसला गिरफदार होईल! आणि बाकी भोंसला तर रायगडींच असणार; तेव्हां सडा संभाजी जमेस धरूनच सौदा झाला पाहिजे. नाहींपेक्षां 'रायगडासकट संभाजी' असा हिय्या करा. दहाच काय, म्हणाल तेवढ्या जहागिरीची सनद उद्यां बादशहाकडून तुमच्या हातीं टाकवितों.

कलुषा:—छे, छे, भलतेंच ! उगीच आपलें आभाळ गडगडलें म्हणून धरणीवर डिरकांड्या फोडणारे आम्ही नव्हत. मग सिंह न म्हणतां कुणीं आम्हांला ग्रामसिंह म्हटलें तरी पत्करलें.

गणोजी:—मग दस लाखाची जिकीर सोडा !

कलुषा:—नाहीं होणार ! अगदीं निभणार नाहीं ! मग मराठेशाहींत काय कमी आहे आम्हांला! गेलीं वीसपंचवीस वर्षें ह्या मराठेशाहींत मी वावरतों आहें, मंत्रतंत्राच्या भुलथापांनीं आणि निशापाण्याच्या बेहोश उपायांनीं संभाजीला बगलेंत मारून मुक्त्यारीनें दरबारच्या उलाढाली करतों आहें; बेश आहे सारें कांहीं. सरदारसाहेब, कोणी झालें तरी तुपासाठीं उष्ट्याची आशा करणार! साधल्यास ह्या फितुरींत आम्ही इतकेंच साधणार कीं, आम्ही मूळ उत्तर हिंदुस्थानचे रहिवासी, तेव्हां त्याच प्रांतीं पोटापुरती मीठभाकरी सत्तेची व्हावी, उद्यां पोराबाळांना दुसऱ्यांच्या तोंडाकडे पहावयाची पाळी न यावी. पण बादशहा जर आम्हांला अर्धपोटी ठेवीत असतील तर आम्हीं तरी भरल्या ताटाला लाथ कशी आणि कां मारावी ?

मुकर्रब:—हें पहा कब्जी, अडवणूकच केलीत तर गरज म्हणून कबूल करू. पण खुशीची बात बोलायची तर थोडें खालीं उतरलें पाहिजे तुम्ही.

कलुषा:—नाहीं, नाहीं, नाहीं ! बात करूं नका तसली. बोललों तें बोललों ! जिवावरचें कारस्थान उरकायचें आहे, मस्करी नव्हे महाराज !

मुकर्रब:—मग कसें शिर्के ? कब्जी तर मुंगळ्यागत चिकटलेत दसलाखाला !

गणोजी:—कसें काय ? कब्जी जरा—

कलुषा:—बाजूला होऊं म्हणतां ? ठीक आहे. (स्वगत) चालूंद्या–

चालूंद्यात तुमचीं खलबतं ! खुशाल कान चघळा; माझ्याशिवाय आतां गतच नाहीं तुम्हांला. एका पिसाळाची तुम्हांला आशा होती; पण सकाळींच त्याला कैदखान्यांत डांबून टाकलाय्, ह्याची कुठें दकल आहे तुम्हांला !

**मुकर्रब**:—( स्वगत ) मग कसें करावें म्हणतां ?

**गणोजी**:—कसें काय ? करा कबूल. इतका वेळ मीं आढेवेढे घेतले ते जहागिरीची जिकीर करावी म्हणून नव्हे, तर यानें रायगडासकट संभाजी सुपूर्त करावा म्हणून घेतले; जाऊं द्या, करा कबूल.

**मुकर्रब**:—राजाजी, बेभान बनलांत कीं, कब्जीनें कांहीं जादूटोणा केला तुम्हावर ! वंशपरंपरेनें दहा लाखाची जहागीर कबूल करायची ?

**गणोजी**:—खानसाहेब, गरजवंताला अक्कल नसते ! करा कबूल.

**मुकर्रब**:—शिरके, सुडाच्या खुमखुमीनें उतावीळ झालां आहांत तुम्ही. तोंडाची वाफ दवडून माप भरीस घालाल मला; पण माझ्या इतमामा-बरहुकूम माझी जबाबदारी जाणली पाहिजे मी. बादशहांच्या हुकुमाबिगर अशी कबुली देतांच येणार नाहीं मला.

**गणोजी**:—मग काय; आयत्या वेळीं नकार देऊन सगळ्या कारस्थानाची नासाडी करून घेणार आपल्या ? मग तुम्हां मोंगलांची एवढी मोहबत केली ती फुकटच ?

**मुकर्रब**:—फुकट कां होईल ! सूर्याजी पिसाळाशीं आपलें कारस्थान आहे. त्याच्या मदतीनें बार उडवून देऊं.

**गणोजी**:—भ्रमांत आहांत खानसाहेब ! चोराच्या हातांत आपल्या कारस्थानाचा जामदारखाना गेला आहे. आतां याच्याच तंत्रानें चाललें पाहिजे. नाहींतर सूर्याजीसुद्धां सगळें कारस्थान सफा करून टाकील हा. करा कबूल. ह्या मांगाला ही जहागीर मी पचूं देईनसें वाटतें तुम्हाला ? माझ्या भाऊबंदांच्या कत्तलींतला त्या संभ्याचा साथीदार हा ! ह्यालाही उरीं फुटेतों रक्त ओकायला लावीन ! करा कबूल.

**मुकर्रब**:—मग करतों तर कबूल.

**गणोजी**:—(उघड) कबूल, कबूल ! खानसाहेब, कब्जी आणि आम्ही कांहीं दोन नाहीं !

**मुकर्रबः**—बरें चला ! कब्जी, नक्की समजायची ही मसलत ! बरें, पण संभाजीला कधीं व कुठें सुपूर्त करणार आमच्या ?

**कलुषाः**—त्याची पंचाईत आज कशाला ? संभाजीला उद्यां इथून बाहेर काढतों. बादशाही शिक्कामोर्तबीनें सनद हातीं टाका, त्याला तुमच्या स्वाधीन करतों. मग काय तक्रार आहे. मात्र सनद हातीं पडल्याशिवाय संभाजीचा पत्ता तुम्हांला मिळणार नाहीं. हें ध्यानांत धरायचें म्हणजे झालें.

**गणोजीः**—ठीक आहे, येतों तर आम्ही. चला खानसाहेब, चंद्रोदयाच्या आंत आपल्याला महाडापार झालें पाहिजे.

**कलुषाः**—तुम्हांला वाटेला लावून आम्हालाही गेलेंच पाहिजे गडावर. खाशाबा, मशाल घे.

[ **कलुषा, गणोजी, खान** जातात व **शाहीर** येतो.

**शाहीरः**—वाहवारे कब्जी ! नीचा, ब्राह्मणापोटीं बेरड कसा निपजलास ? भोंसल्याच्या भोळ्या सांभानें तुला भरंवशानें गळ्याशीं वेढलें असतां, काळसर्पा, त्याच्याच नरडीचा घोट घ्यायला असा टपलास ? कुण्या जन्मींचे झाडे घेण्यासाठीं असा मराठ्यांच्या राशीला आलास ? चंद्रसूर्याला ग्रासणारे ग्रह सुटून जातात, शनैश्चरासारखा पापग्रहसुद्धां रास बदलतो. पण तुझ्यासारखें शेंडेनक्षत्र मात्र राजाच्याच मुळावर आलेलें असतें, हें आतां पुरेपूर कळून चुकलें ! बस्स ! यापुढें शंभुराजांचा बचाव ! शिरकाणाच्या सुडास पेटलेला गणोजीसारखा दिवटा हातीं धरून कब्जीसारख्या घरभेद्याच्या आडोशाला मोगलांनीं दबा धरल्यावर शंभुराजांना काळाच्या जबड्यांतच सोडून, घरधनिनीसाठीं मी सोंगाढोंगाची बतावणी करीत राहिलों तर माझ्यासारख्या कृतघ्नाला महाराघरीं तरी अन्न मिळेल का ?

[ **चंद्रावळ** येते.

**चंद्रावळः**—शाहीरा !

**शाहीरः**—( स्वगत ) दुर्दैवी पतिव्रते ! कशाला ह्या दुर्भाग्याला हांक मारतेस ?

**चंद्रावळः**—शाहीरा, असें मौन कां धरलें ? ताटातुटीनें दुखावल्या जीवावर असा मुका घाव कां घालतां ?

**शाहीरः**—(उघड) कसें सांगूं चंद्रावळ? माझ्यासाठीं तुझ्या जन्माचे असे धिंडवडे होत असतां, तुझ्याशीं कोणत्या तोंडानें बोलूं? आम्हां शाहीर घराण्याचा कुळाचार ठावा आहेना तुला?

**चंद्रावळः**—हो! गायचें असेल तर खरा पोवाडा गायचा. प्राणांतींही खोटीं गाणीं गायचीं नाहींत, हाच ना? मग शाहीरा, मीं तुला कधीं तरी म्हटलें कायरे, कीं खोटीं गाणीं गा आणि मला बंदींतून सोडीव म्हणून? मन दगडासारखें घट्ट करीन, जिवाला तुझी ओढ बसली तरी तसा त्याचा कोंडमारा करीन; कधीं कधीं सांगणार नाहीं खोटीं गाणीं गायला. मग झालें ना?

**शाहीरः**—चंद्रावळ, साऱ्याच फुलांना देव्हाऱ्यांत थारा नसतो. साडे-सातीनें आज आपण वनवासी झालों आहों. सर्जा-खाशासारख्या शिपुर्ड्यांच्या पायदळीं लोळतों आहों, पण होतें तें सारें बऱ्याकरतां असतें, अशी मनाशीं गांठ बांधून, संकटाशीं झगडायला तयार हो!

**चंद्रावळः**—शाहीराच्या बोलाचीं फुलें जिवाची ओंजळ करून, चंद्रावळ झेलील. पण जिवलगा, जीवकुडीची ताटातूट आणखी होणार असेल तर कुडी कोमेजून पडेलना आतां!

**शाहीरः**—नाहीं. सहगमनाचेंच व्रत सांगतों तुला!

**चंद्रावळः**—मग सतीच्या व्रताला मी जन्मोजन्मीं राजी होईन.

**शाहीरः**—चंद्रावळ, संधि साधून तुला पळवून नेण्यासाठीं आणि कब्जीच्या फितुरीचा छेडा लावण्यासाठीं कातकऱ्याच्या सोंगानें मीं इथें शिरकाव केला; पण ह्या भूतखान्यांतल्या कारस्थानानें मराठेशाहीवरच्या उद्यांच्या अरिष्टाची खात्री होतांच, कांहीं काळ ह्या भूतखान्यांतच तुला ठेवायची असा मीं निर्धार केला आहे.

**चंद्रावळः**—पण अशा अघोरी तपानें मिळविणार तरी काय आपण?

**शाहीरः**—अन्नदात्याचा जीव! चंद्रावळ, नवऱ्यानें न सांगायची गोष्ट निर्लज्जपणानें सांगितल्याबद्दल जगानें नांवें ठेवलीं तरी फिकीर नाहीं. ह्या उलट्या काळजाच्या कब्जीनें आपल्या कारस्थानांत सामील करून घेतलेले, हे खाशा-सर्जासारखे निगरगट्ट बेरड कधीं कोणाला फसणारे नव्हत; पण स्त्रीलोभानें स्वाभाविक फशीं पडत आहेत; ह्या कसाबांच्या मनांत तुझ्या-

विषयीं पाप आलें आहे. त्याचा अखेरपावेतों फायदा उठवून कलुषाला गारद केला पाहिजे. नाहींतर, शंभुराजांना मोगलांच्या समशेरीचें पाणी पाजून, गणोजी शिर्के आतां शिरकाणाचा सूड उगविल्याविना रहात नाहीं.

**चंद्रावळ:**—शाहीरा, गेल्या तीन पिढ्यांपासून आपण भोंसल्यांच्या भाकरीनें पोसलों, ते अशा आणीबाणीच्या संकटीं पदरीं निमकहरामी घेऊन, शाहीरकुळीला कलंक लावण्यासाठीं नाहीं. हा पाहिलात. [ खंजीर दाखविते.] बदफैल्यांच्या गर्दीतही चंद्रावळीच्या पातिव्रत्याची पुण्याई सबळ ठेवणारा हिचा सोबती. चंद्रावळीच्या सुकुमार मनगटांत पाप्यावर ह्याचा घाव घालायचें बळ नसलें तरी स्वतःच्या उरांत खुपसून घेण्याइतकी पुण्याई आहे याची खात्री धरा; आणि ह्याच पावलीं गड चढून, मासाहेबांना आधीं सावध करा !

**शाहीरः**—गृहलक्ष्मीनें पाठबळ दिल्यावर वाऱ्यासारखा गड चढून जाईन. मी येईपर्यंत हुशारीनें रहा बरें ! येतों मी ! [ जातो.

## पहिला अंक समाप्त

# अंक दुसरा

## प्रवेश पहिला

[ स्थळ—खलबतखान्यानजिक पटांगण. पात्रें—सर्जाबा.]

सर्जाबाः—खाशाबानें, एकीकडे नेऊन दोन तोंडांत दिल्या असत्या तरी त्याची देखील दिक नव्हती; पण चंद्रावळीदेखत त्यानें माझे धिंडवडे काढल्यानें जीव कसा झरझरून राहिला आहे! अशानें बाप्यांचें वजन तेवढेंच कमी होतें बायकांत. त्यांतून ही चंद्रावळ तिसऱ्याची बाईल. अशा आषुकमाषुकांच्या भानगडींत माझी बरी बाजू तेवढीच पुढें मांडायचा माझा विचार; पण हा लेकाचा माझीं बिंगन्‌बिंग बाहेर काढीत सुटला. तिच्यादेखत या उतारवयांत हरिहरि करीत बैस म्हणाला! छे, छे, छे; जिवाचा कसा हुळहुळा होऊन जातो! कधीं एकदां अशी मैदानांत गांठ पडते, असें झालें आहे मला. निर्धारच केला आहे मीं. चंद्रावळीशीं लगट करायची संधि यापुढें तरी खाशाबा देतो आहे कीं नाहीं, याचा आज आखरी खुलासा करून घ्यायचा. त्यानें मानलें तर ठीकच; नाहींतर खाशाबाला चार रट्टे देऊन तें पांखरूं आज इथून आपण उडवणार! मग होईल तसें जाईल. पण आधीं हा खाशाबा आतां भुयार कसें सोडणार? असा मैदानांत गांठावा म्हणून नाहीं नाहीं त्या कुचाळ्या करून बघतों आहें, पण एकदां जी घुबडागत त्यानें दडी दिली आहे, तो कांहीं केल्या खलबतखाना सोडीत नाहीं. निदानला या खलबतखान्यांतच बार उडवूं म्हणा; पण होतां होईलतों चंद्रावळीदेखत दांडगेपणा न केलेला बरा. आतां तिला लागून एक लावणी म्हणूं, म्हणजे तरी लेकाचा खवळून बाहेर येईल.

[ लावणी म्हणतो.

## लावणी.

[ चाल—कुठवर पाहूं वाट सख्याची]

पतीपारखी पोर, चंद्राची कोर, नवी नवती जी
साजणी ग, तूं जळावीण मासळी जी
फुलला प्रीतिचा बाग, बघुनि बेजाग, चोर दबलों जी
साजणि ग, तूं मृगावीण हरिणी जी
॥ चाल ॥ कडकडुनि कवळि बघ बिजली नभीं मेघांना
प्रीतिनें रंगल्या ग रानीं पोपटमैना
करुनि जिवाचा धडा, इष्काचा कडा, हळुच उतरूं जी
साजणिग, ही दोन दिवस दुनिया जी ॥

[ सर्जा जातो व दुसरीकडून खाशा येतो.

**खाशाबाः**—अरे राम राम! काय राशीला लागलाय् राक्षस हा! बाहेरख्यालीनें माणूस इतकें निस्संग होतें अं! मी म्हणतों, माणसानें आपल्या जानीजवानींत, जरा आडोपडोशाला चोरटीं गोकुळं थाटलीं, तर तें एकदां आमच्या गद्धेपंचविशीला शोभेल; पण ह्या ह्या सर्जाबाची, आतां बत्तिशी पार पडली; चाळीशी गुदरली; पोक्तपणाच्या माथ्यावरून हा म्हातारपणाच्या घसरगुंडीला लागला आहे. तरी पुन्हां फिरून असा उलटा पहिल्या पंचविशीच्या पणांत यायला बघतो आहे. भोळ्या सांभानें मदनाला फिरून सजीव केल्याची जर कधीं चीड येत असेल तर ती अशा वेळीं! निदान अशा थेरडयांचा तरी त्यानें बंदोबस्त करायला पाहिजे होता. काल भुयारांत इतका झाडला, हाडुतहुडुत केला, तरी धर्मशाळेंतल्या कुत्र्यागत पुन्हां दशमी पळवायला तयार! खलबतखान्यांतून हांकलला तरी खलबतखान्याच्या औतीभोंवतीं घोंटाळतो आहे; पण इथें मरतो आहे! खाकरतो आहे काय, शिट्या काय घालतो आहे, लावण्या काय गुणगुणतो आहे! अरे! अरे! अरे! कहर कहर मांडला आहे निस्संगानें! ह्याला अशा खोंडागत इथें खळ्या खणतांना बघून आपली तर पांचावरच धारण बसून गेली आहे सकाळधरनं! हो, दिलेन् दोन रट्टे तर घ्या काय ह्या फटिंगाचें! [ सर्जा अवचित झडप घालतो.

**सर्जाबा**:—भला गवसला लेक कचाट्यांत आतां! भरलींच शंभर वर्षें तुम्हीं!

**खाशाबा**:—अरे बापरे! मारणार आम्हाला आतां हा. काल्च्या त्या गोम्याचाही कुठें पत्ता नाहीं अजून. आपलीं गाडग्गीमडकीं आणायला म्हणून गेला आहे. तो इतक्यांत आला, तरच त्याची आमची जिवंतपणीं भेट! नाहींतर त्याच गाडग्यामडक्यांची शिंकाळी करून आमच्या तिरडी-पुढें चालावें लागणार त्याला!

**सर्जाबा**:—आटप, आतां कां मुडद्यागत ताठतो आहेस असा?:तूंही चार आखाडे पाहिले आहेस ना? मग तुझी मुलतानमाती अशी गारठली कां? चल, मरणाला तयार हो.

**खाशाबा**:—अरे मुडदेफरास! माणूस कधीं मरायला तयार झालें आहे आजपर्यंत? वास्तविक ज्यांनीं बिनहरकत मरावें, अशीं जख्ख थेरडीं-सुद्धां, नातवंडा-पणतवंडांच्या लग्नामुंजी बघितल्याविना मरायला तयार नसतात. मग मी तर नव्यानवतीचा पोरगा. पिळला तर दूध कीरे निघेल या पोराच्या ओंठांतून! आणि मला मरायला तयार हो म्हणतोस?

**सर्जाबा**:—अलबत् म्हणतों. अरे बाबा, आडवें आलें तर पोरसुद्धां कापून काढावें लागतें. मग तूं तर माझा रंगबाजींतला वैरी; सामनेवाला. एकेका पकडीगणिक एकेक जीव घेऊन माझ्या पंचप्राणांचा गठ्ठा खलास करणारा तूं! तुला कसा जिवंत सोडूं बाबा? [ मान धरतो.]

**खाशाबा**:—अस्सें! मग घेणारच म्हणतोस आमचा जीव अं! घे, घे; नाहीं! घेच तूं जीव माझा. जीव जाऊं दे म्हणजे सांगतों तुला.

**सर्जाबा**:—जीव गेल्यावर सांगणार तूं होय?

**खाशाबा**:—हं, त्यांतच गोम आहे राया! अरे, जिवंतपणींच मेल्या-सारखे असतील त्यांना मरणाचें भय. पण मेल्यावरही जिवंत राहणारे जिवंतगडी आम्ही. जीव जाऊं दे आमचा म्हणजे सांगतों तुला. (स्वगत) अशाच वाचाळपणानें घोर लांबवीत बसावें आतां. आलाच तो रानदांडगा तर ह्याचीच पांजी भरणार आहे. नाहींतर जीवदान मागून जगायचें हें उरलेंच आहे. हो, जगलोंवांचलों तर आज नाहीं उद्यां चंद्रावळ लाभेल;

पण तिच्यापायीं आज मेलों तर ती थोडाच सतीचें वाण घेऊन येणार आहे माझ्या मागें ! ( उघड ) हं; सर्जाबा, आटप; घे जीव माझा.

**सर्जाबा**:—ठीक आहे. तुला एक शेवटची संधी देतों; ती मानली नाहींस तर घेतोंच जीव तुझा. ऐक, आपली इष्कांतली तेढ काढून टाकायला तूं राजी आहेस का ?

**खाशाबा**:—असें म्हणतोस होय ? ठीक आहे, बसा वाटाघाटीला. [ बसतात ] हं बोला, कशी भानगड मिटवावी म्हणतां ? आं ! पण दोन बाप्यांत एक बायको कशी वांटायची ? ती शेळीमेंढी असती तर कसातरी वांटा घालतां येता; शेतीवाडी असती तर अर्धेलीनें करून निपजींत निम्मानिम हिस्सा ठेवतां येता; पण ही पडली बायको ! मग हा तंटा कसा मिटवायचा ?

**सर्जाबा**:—अरे, त्यांत कांहीं अवघड नाहीं. मीं काढली आहे त्याला एक तोड.

**खाशाबा**:—म्हणजे आमची लांडगेतोडच ना ?

**सर्जाबा**:—छे, छे, आधीं तसें कांहीं नाहीं. चंद्रावळीशीं दिलचाहीशी लगट करायची तूं यापुढें मला सवड देशील, तर मनांतलें काळेंबेरें काढून टाकून आपण संवगडी खेळीमेळीनें वागूं. आणि नसलेंच तुला माझें मानायचें तर तुझी मुंडी छाटून ती पोरगी आज आपण इथून पळवणार. पहा; कोणतें पसंत पडतें आहे तुला ?

**खाशाबा**:—अरे कसाबा ! तुझा तर खरोखरच मुंडी छाटायचा विचार दिसतो आहे कीं !

**सर्जाबा**:—मग तुला काय मस्करी वाटली होय सगळी ? अरे, संतापावर विरजण घालून इच्छामरण देतों आहें हें भाग्य समज !

**खाशाबा**:—पण इथें कोण लेक ब्रह्मचारी भीष्मापोटीं निपजला आहे, तर इच्छामरणाची हौस फेडून घ्यायची. आपण तर मुळीं मरायचेंच नाहीं असें ठरवलें आहे. अरे वेड्या, भीष्माचार्यांत आणि आमच्यांत भारी तफावत ! तो ब्रह्मचारी तर मी स्वैरचारी; त्याला मुळीं बायको नव्हतीच तर मला लग्नाची असून मी आडपडदा आडगिऱ्हाइकी मिळाली तर बघणारा; तो शरपंजरीं पडून उत्तरायणाची वाट पहाणारा तर मी मदन-

शरांनीं घायाळ होऊन चंद्रावळीवर डोळा ठेवणारा. मग तूंच सांग, कसें इच्छामरण देणार तूं मला ? अरे, इच्छामरण तर काय पण माझी अंदरकी बात–झाडून सगळीं अंडींपिलीं तुला सांगितलीं तर तूंच कबूल करशील, कीं ह्या जन्मींतरी निदान मला मरण नाहीं ! शंका असेल तर समाधान करून घे. मी मरायला तयार आहें ! हाण !

सर्जाबाः—खाशा, फुकट फुकट मरतो आहेस बरें.

खाशाबाः—नको, नको ! तूं नको माझ्यासाठीं एवढा कळवळा दाखवूं ! धीरानें धर तलवार आणि टाक मारून मला कसा तरी. अरे वेडया, दोस्ताला जमीनदोस्त करायचा नाहीं तर काय शत्रूवर तलवार चालवायची ? आटप ! हाण !

सर्जाबाः—खाशा, अजून बजावतों. मरूं नकोस. माझ्या वडीलकीचा मान ठेव.

खाशाबाः—वडीलकीचा मान द्यायला मी पहिल्यापासून तयार आहें.

सर्जाबाः—तो कसा ?

खाशाबाः—वडिलांनीं चंद्रावळीशीं पोराचे दोन हाताचे चार हात करून द्यावेत आणि खुशाल डोळे मिटावेत.

सर्जाबाः—अरे चोरा.

खाशाबाः—श्राद्धपक्ष आम्ही आठवणीनें करूं ! पण तेंच तर वडलांना जड जातें आहेना ! त्यांना पाहिजे पोराचा खुर्दा करून स्वतांच चतुर्भुज व्हायला; त्यालाही माझी तयारी आहे. आतां ह्यांत उफराटें एवढेंच होत आहे, कीं जगांत वडलांना पोरांचीं लग्नें लावून द्यावीं लागतात आणि इथें पोराला वडिलाचें लग्न लावावें लागतें आहे ! पण काळच उफराटा आला, त्याला काय करणार ! शिवाय आपण तरी खरे बापलेक कुठें आहोंत ? आटप, हाण.

सर्जाबाः—ठीक आहे. कर मुंडी पुढें. घे देवाचें नांव.

खाशाबाः—आणि चंद्रावळीचें घेतलें तर ?

सर्जाबाः—जीभ छाटून टाकीन.

खाशाबाः—मग गर्दन छाटणार होतास त्याचें काय झालें ?

सर्जाबाः—अरे गर्दन तर छाटतोंच, पण शिवाय जीभ छाटतों.

खाशाबाः—गप्पा छाटतो आहेस झालें! अरे बजरबट्टू, गर्दन छाटल्यावर जीभ छाटून रे काय फायदा? आणि जो गर्दन छाटून घ्यायला तयार तो जीभ छाटून घ्यायला डरेल वाटतें? जीभ छाट नाहींतर गर्दन छाट. आपण तर चंद्रावळीच्याच नांवाचा गजर करीत राहणार! चंद्रावळ, चंद्रावळ, चंद्रावळ!

सर्जाबाः—[ तलवार उपसून ] जयजय भवानी!

खाशाबाः—अर्ररं! थांब, थांब! थांब जरा! आडदांडा, मला मरणकाळची इच्छा विचारशील कीं नाहीं? का सुरा घेऊन खाटीक चालला मेंढरें कापायला! अरे, इच्छा राहून मेलों तर भूत होऊन बसेन कीं मानगुटीला!

सर्जाबाः—मी नाहींरे भुताखेताला मोजीत.

खाशाबाः—पण चंद्रावळीलाच झपाटलें म्हणजे मग?

सर्जाबाः—बरें, सांग बघूं तुझी मरणकाळची इच्छा.

खाशाबाः—माझ्या हातानें तुला मूठमाती मिळावी एवढीच माझी मरणकाळची इच्छा आहे.

सर्जाबाः—अरे, माझी तर ह्याच्या अगदीं उलट आहे कीं!

खाशाबाः—पण ती मरणकाळची इच्छा कुठें आहे? आधीं मरायला तयार हो आणि मग इच्छा कर.

सर्जाबाः—आणि ही तुझी इच्छा मीं नाहीं पुरवली तर?

खाशाबाः—न पुरवीनास बापडा! झोटिंग बनून चंद्रावळीला झपाटीन.

सर्जाबाः—अंः! त्या लांबच्या गोष्टी आहेत. तूर्त तर तुला ठार करतो. [ तलवार उगारतो.]

खाशाबाः—अरे, पण हो हो! थांब, थांब जरा! काय राव, अगदींच दयामाया नसल्यागत करतां! आमचा जीव घ्यायचा तर जरा आमच्या कलानें घ्याल कीं नाहीं?

सर्जाबाः—पण तुमचा कल तर आमच्याच मरणापर्यंत कलायला लागला कीं!

खाशाबाः—बरें बुवा, फिरून मरणकाळची इच्छा विचार; फिरून सांगतों.

सर्जाबाः—खाशा, तुला काय पोरखेळ वाटतात होय सगळे?

**खाशाबाः**—अरे, पोरखेळ नाहीं तर काय ? तूं म्हातारा; म्हातारपण म्हणजे दुसरें बाळपणच. तसेंच, माझीही पोरबुद्धि अजून गेली नाहीं. माझी म्हातारी अजून बाळ म्हणूनच हांक मारते मला.

**सर्जाबाः**—हं, बस कर आतां ही बडबड.

**खाशाबाः**—ही बडबड नाहीं; आईशपथ ही बडबड नाहीं ! खरोखरच ती बाळ म्हणून बोलावते मला. खरें वाटत नसेल तर गडावरून विचारून ये जा आईला; मी इथेंच उभा आहें. खोटें ठरलें तर कान कापून देईन कान !

**सर्जाबाः**—[ खाशाला ओढून ] मी मान कापायला तयार झालों आहें आणि तूं कान कापून देईन म्हणतोस ? चल; असा वर मान करून उभा रहा.

**खाशाबाः**—(स्वगत) भरली पांजी आतां ! त्या रानदांडग्याचा मागमूस नाहीं अजून अं ! आतां करावें कबूल चंद्रावळीशीं लगट करून देईन म्हणून. आणि उद्यां लगट करायला आला, कीं द्यावा एकदम कातकऱ्याला अंगावर सोडून.

**सर्जाबाः**—खाशा, विचार कसला करतोस ? आटप.

[ तलवार उगारतो.]

**खाशाबाः**—( उघड ) सर्जाबा, ओ सर्जाबा; मरायचा बेत तूर्त रहित केला आहे आम्हीं !

**सर्जाबाः**—कां ?

**खाशाबाः**—वाढदिवस आहे माझा आज. मरणानें वाढ खुंटते; मग वाढ खुंटवून कसा मरूं तूंच सांग ? शिवाय मरायला फुरसद आहे कोणाला ?

**सर्जाबाः**—[तरवार मागें घेऊन] एकूण चंद्रावळीशीं लगट करायची सवड तूं देणार आम्हाला ?

**खाशाबाः**—( स्वगत ) हो, हो ! आडलाच आहे नारायण तसा ! [ पाहून ] अरे, पण हा कोण येत आहे इकडे ! कब्जीचा जासूद हा. ( उघड ) सर्जाबा, चंद्रावळीच्या नादानें पहाऱ्यांत कुचराई करतां हें बरें नाहीं बरें ! बढतीच्या लालचीनें आजवर नांवाची कीरत केली तशी अखेर

साधूं या. नाहींतर तो कब्जी चरकांतल्या चिपाडागत पिळून काढील बरें आपल्याला. [ जासूद येतो.

जासूदः—सर्जाबा, पहारा सोडून काय भटकतां राव!

सर्जाबाः—गडबड काय आहे एवढी?

जासूदः—कब्जीचा सांगावा आहे, कीं ह्याच घडीला भल्या बंदोबस्तीनें चंद्रावळीला घेऊन गड उतरा; पायथ्याला चोरवाटेच्या तोंडाशीं आलांत म्हणजे कुठें जायचें तें तुम्हाला कळेल. लवकर परतायचें नाहीं अशा सरंजामानें मात्र निघा. तर चला; जलदी करा आधीं.

सर्जाबाः—खाशाबा, लागाच पसारा आवरायला. नाहींतर कब्जीचा तडाखा आहे तो.

खाशाबाः—असे काय हत्तीघोडे श्रृंगारायचे आहेत मला? विंचवाचें बिऱ्हाड पाठीवर! तुम्हीच बंदोबस्तीला रामोशी कोण कोण घ्यायचे तें बघा जा. ( स्वगत ) तोंवर त्या रानदांडग्याची मला वाट बघितली पाहिजे.

[ जातात.

---

## प्रवेश दुसरा

[ **स्थळ**—येसूबाईचा महाल. पात्रें—**खंडूजी**.]

**खंडूजीः**—रात्र उलटून गेली, घडींघडीनें दिवसही भला वर आला; आणि शाहीराचा अजून मागमूस नाहीं! हें गौडबंगाल आहे तरी काय? फितुरीच्या सुगाव्यानें बुद्धया हाच खलबतखान्याकडे रेंगाळला, कीं कब्जीच्या पहारेकऱ्यांनीं त्याला कैद केला? खरोखरच शाहीर कैद झाला असेल तर मीं त्याची इथें वाट पहात बसावें आणि कब्जीनें मात्र आपल्या फितुरीचा बभ्रा होतो आहे ह्या धास्तीनें झटपट कारस्थान उरकावें! ह्या बेबंदशाहींत केव्हां काय घडेल कांहीं भरंवसा नाहीं. उगवते दिवस मावळत्या दिवसांना मागें सारतात, आल्या अरिष्टांहून येतीं अरिष्टें भयंकर येतात, आणि ह्या अरिष्टपरंपरेच्या पैलथडीची अंधुक कल्पना करावी म्हटलें, तर तुफान वादळांत गवसलेल्या गलबतागत बुद्धि बेअंदाज हेलकावे खाऊं लागते!

अंधार, सगळीकडे अंधार दिसूं लागतो! अरेरे! पिढ्यान् पिढ्या पसरलेली पारतंत्र्याची अंधारी रात्र ओसरून नुक्ता कुठें मराठ्यांचा स्वातंत्र्यसूर्य उगवला नाहीं, तोंच त्याला बेबंदशाहीच्या ग्रहणांनीं असें ग्रासलेलें पाहून स्वर्गीं आबासाहेबांच्या नेत्रांतून अश्रुधारा वाहूं लागल्या असतील! हिंदु-धर्म नामशेष करूं पहाणाऱ्या इस्लामीयांशीं झुंजण्याकरितां पंढरीच्या सोहळ्याला भक्तीचें भरतें आणून मराठ्यांच्या बळाला बळकट करणाऱ्या कविश्रेष्ठांचे कंठही वैकुंठांत श्रीविष्णुपदापाशीं गहिंवरले असतील! औरंगजेबानें आजवर उघड उघड मैदानांत लढाई मांडली होती, त्याची तितकीशी आम्हां मराठ्यांना डर नव्हती; पण समशेरीनें शह देण्याची घमेंड जिरल्यावर त्यानें फंदफितुरीचा तेढा डाव मांडला; ह्यानें मात्र भल्या भल्या अक्कलवंतांचीही मति गुंग होऊन गेल्याविना रहात नाहीं! आम्हां मराठ्यांच्या गांठीशीं पूर्वसुकृताचें बळ जबर, म्हणून मासाहेबांसारखी साध्वी राणी—[ पडद्यांत संतुमाई हांक मारते—भाऊ! अरे भाऊ! ] ओ, ओ! ये ग माई. [ संतुमाई येते.

माईः—भाऊ, बराच आहेस कीरे.

खंडूजीः—विचाराच्या भरांत तुला अगदींच विसरून गेलों बघ माई.

माईः—वहावारे लबाडा! तुला राजवाडा दाखवितों, राणी दाखवितों असें गोडगोड बोलून मला धरून घेऊन आलास आणि त्या अनोळखी जागीं मला एकटीला बसवून चालता झालास ना?

खंडूजीः—मग वेडे, एवढें घाबरायला काय झालें त्यांत?

माईः—तर तर, तुला हंसायला काय होतें! मी मात्र विनाकारण बावरलें.

खंडूजीः—विनाकारण घाबरलीस खरेंना?

माईः—विनाकारण घाबरलें कारे?

खंडूजीः—अग, तूंच म्हणालीस ना आतां? बरें बुवा; मुळींच घाबरली नाहींस, मग झालें?

माईः—मुळींच कशी घाबरलें नाहीं! बघ बघ, पाय लटलटत आहेत कीं अजून! भाऊ, हंसूं नकोस असा. आम्ही खेडेगांवचीं भोळींभाबडीं माणसें! शहरांनगरांतून वावरतांना नवशिकेपणानें जरा बावरल्यागत

दिसलों म्हणून आमच्या भोळ्याभावाचें हसें नको कांहीं व्हायला! नाहींतर मला आपली घरींच धाडून दे कशी. तुझी ती राणीही बघायला नको आणि राजवाडाही देखायला नको!

**खंडूजीः**—हं, हं! वेडे, इथें अशी भसतेंसलतें बडबडूं नको. हा राजवाडा आहे, ध्यानांत ठेव.

**माईः**—बाई, बाई, बाई! एवढ्या मोठ्या राजवाड्यांत मनमोकळं बोलाचालायचीही मोकळीक नसते का? हात्तिच्यारे! मग आम्हां गोर-गरीबांच्या झोपड्याच बेस म्हणायच्या कीं! [ येसूबाई येते.

**येसूबाईः**—साजरे मुली, गरिबांच्या झोपड्या बेस असतातच; पण आमचे राजवाडे कांहीं वाईट नसतात हो! तूं अगदीं मनमोकळी बोल. तुला कोणीं नांवे ठेवायचें नाहीं इथे. कारे खंडोबा तिला धाक घालतोस?

**माईः**—बाई, कोणा थोरामोठ्याच्या दिसतां आपण. भारी भारी गोड बोलतां! हा आमचा भाऊ कि नाहीं, अगदीं अश्राप गाय आहे बघा. घरीं असो, कीं दरबारीं असो; आदब कशी ती सुटायची नाहीं आणि सदा चिंतेत गढलेला; जणूंकाय, सगळ्या मराठेशाहीची काळजी वहावी लागते ह्याला! अक्कलहुशारीत बापसे बेटा सवाई निपजला. पण लेंकराचे कौतुक बघायला बिचाऱ्या बाळाजी आवजींना कांहीं देवानें राहूं दिले नाहीं! ह्या ह्या तुमच्या शंभुराजांनींच माझ्या काकांना हत्तीच्यापायीं दिले! आणि ह्या चिमण्या भावांना बापावांचून परदेशी केले! आतां इमानाच्या बळावर हा चाकरींत अतर पडूं देत नाहीं खरा, पण शंभुराजांच्या धाकाला मनांतून अगदीं धास्तावून असतो.

**खंडूजीः**— माई! आतां जरा गप बसशील का?

**माईः**—आतांच बघितलेत ना? ह्या राजवाड्यांत मला कशी मन-मोकळी बोलूं देईना तें? बाई, तुमच्या डोळ्यात झर्रकन् पाणी आलें की हो! कुणाकुणाचें मन असें हळवे असतें. तुमची राणीसुद्धां थेट तुमच्या सारखीच हळव्यामनाची बाई आहे म्हणे! त्या साध्वीनें मायममतेनें माझ्या भावांना पोटाशीं धरले आणि हे सोन्याचे दिवस दाखवले! कधीं एकदां त्या माउलीच्या चरणावर लोळण घेईन असें झालें आहे मला.

**येसूबाईः**—भाबडे मुली, आतां कसें बोलावें तुझ्याशीं? अनोळखी-

पणानें माझे गुण गाइलीस खरी; पण सारें ब्रह्मांड उभें केलेस आमच्या-समोर! माई, मीच ती दुर्दैवी राणी बरें!

**माई:**—अगबाई, खरें कीं काय! [ येसूबाईला नमस्कार करते.] कायग बाई मी चांडाळीण! भाऊ, तुझ्या शहाणपणाला मघां मी हंसलें आणि भाबड्या बडबडीनें शेवटीं फसलेरे फसलें! राणीच्या तोंडावर किरे राजाला नांवें ठेवलीं!

**येसूबाई:**—अशी घाबरूं नकोस माई! अग, खऱ्याला का कुठें मरण असतें?

**माई:**—त्याचा काय नेम! थोराघरीं खऱ्याखोट्याची पारख असती तर माझ्या काकांचें तें तसें कशाला झालें असतें! झाल्यागेल्या गोष्टीचें जावो मेलें! पण आम्हां चिटणीसांच्या कच्च्याबच्च्यांना, परदेशीपणांत धर्माची मायमाउली होऊन तुम्ही सांभाळ केलात आणि मीं खुळीनें मात्र नसत्या उखाळ्यापाखाळ्या काढून तुम्हाला आज आंसवें ढाळायला लावलीं!

**येसूबाई:**—जाऊं दे माई! आमचें काय घेऊन बसलीस. हें आमचें नित्याचें आहे! सतीसाध्वींच्या चरित्रांनीं संकटीं मन कसें घट्ट ठेवावें, हें आम्हांला आतां पुरेपूर शिकवलें आहे. तूं आपल्या रानगांवाहून दोन दिवस पाहुणी म्हणून भावाच्या भेटीस इथे आली आहेस असें परवांच खंडूजीनें सांगितलें, पण तुला बोलावणें करायलाही फावलें नाहीं. आज आतां तूं जाणारच म्हणून समजलें, तेव्हां काढली फुरसत कशीतरी! कोणे आहे ग तिकडे? [ पडद्यांत **शाहीर**—रक्षी रक्षी रक्षी प्रभो नृप, वक्र गती अनिवार पातली शनैश्वरी बाजार। ठक सौदागर, ठकविल करुनी वारूवरती स्वार विक्रमा दाविल यमदरबार.]

**खंडूजी:**—दगा, दगा. खात्रीनें दगा आहे! शाहीराचाच शब्द हा.

[ **दासी** येते.

**दासी:**—सरकार, घाबऱ्याघाबऱ्या दौडत बाहेर शाहीर आले असून आतांच्या आतां सरकारची मुलाखत मागत आहेत.

**खंडूजी:**—जा, जा आधीं घाडून दे त्यांना आंत! आणि हें पहा, कोणी हुजऱ्या बरोबर देऊन यांना आमच्या चिटणीसांच्या वाड्यांत पावत्या कर. माई, उचल पाय जलदी! [ **माई** व **दासी** जातात.

समशेरी सरसावून कब्जीला कंठस्नान घालणें, अधिक शहाणपणाचें नव्हे काय ? करतां येणारी बहादुरी करून दाखवावयाच्या उद्योगाला न लागतां, जीव घोरांत कां ठेवावयाचा तें समजत नाहीं !

**खंडूजीः**—शाहीर ! अशा बहादुरीला वाव असता तर हीं मोती-मोलाचीं आसवें अशीं मातीमोल मीं वाहूंच दिलीं नसतीं. कलुशाच्या रक्तानें रक्तबंबाळ होऊन नंतरच हा खंडूजी मासाहेबांच्या मुजऱ्याला आला असता. पण दुर्दैवानें तशी सवडच ठेविली नाहीं ! कब्जीच्या जिवाची रखवाली खुद्द दख्खनच्या बादशहानेंच पत्करली ! त्याने सगळ्यांचाच नाइलाज झाला आहे ! अशा अवघड स्थितींतही कोणीं धाडसानें तरवार चालवलीच, तर ह्या रायगडावर पुन्हां एकदां मातबरांच्या रक्ताचा सडा पडल्याशिवाय राहणार नाहीं. खाटकाला गाय धारजीण तशी आज खाशांची गत झाली आहे. अकस्मात् घाला घालून कब्जीला गारद करावा तर स्वकीयांची कत्तल होणार आणि असें न करावें तर महाराजांच्याच जिवावर घाला पडणार असा हा विलक्षण पेंच आहे. [ दौलती येतो.] काय आहे दौलती ?

**दौलतीः**—हुकुमाबरहुकूम खाशांकडची खबर आणली आहे सरकार ! सदरेवरच्या आंबराईत स्वारीना आतांच गडाखालीं नेण्यासाठीं तुळशीनें आपलें मोहजाल पसरलें आहे. आणि अशात कब्जीही घाईघाईनें आतां तिकडे जातांना दिसला !

**शाहीरः**—चिटणीस, क्षणाक्षणानें जसजसा वेळ जातो आहे तसा राजांचा घोर दुणावतो आहे कसाही अवघड प्रसंग असला तरी त्याला तोंड हें दिलेच पाहिजे, आतां रक्तपाताला भिऊन कसा निभाव लागेल ?

**खंडूजीः**—नाहीं, शाहीर नाहीं. ह्या पेंचांतून सर्वांचीच सुरक्षित सुटका झाली पाहिजे. आणि ती अकलमंदीनेंच होणार आहे. मासाहेबांनीं आतां विलंब न लावितां तडक खाशांच्या मुलाखतीला निघावें. गोषाचा मान राखण्यासाठीं कब्जीला स्वाभाविकच दूर व्हावें लागेल. ह्याच संधीचा फायदा घेऊन आधीं खाशांचा बचाव करूं, आणि नंतर कब्जीच्या नाशाचा विचार करूं. आतां जलदी व्हावी मासाहेब !

**येसूबाईः**—काय सांगावें खंडूजी ! 'मन चिंती तें वैरी न चिंती'

म्हणतात, तशा नाहीं नाहीं त्या अशुभ कल्पनांनीं चित्त कसें भांबावल्यागत झालें आहे. ह्या अरिष्टांतून आतां सुरक्षित सुटका होईल असा मनाला भरंवसाच येत नाहीं. पण जिवाचा कोंडमारा टाळण्यासाठीं, अमुक एक इलाज केला नाहीं अशी जिवाची हुरहुर राहूं नये एवढ्यासाठीं तरी स्वारींच्या चरणावर लोळण घेतलीच पाहिजे. जगदंबेनें आम्हांला एवढें यश द्यावें म्हणजे झालें.

खंडूजी:—मासाहेब, भवानीमातेच्या कृपेनें मराठेशाहीवरचीं महान् महान् संकटें टळलीं आहेत, मग आजच अशा उदास कां होतां? ज्यांच्या गाठीशीं गोब्राह्मणप्रतिपालनाचा पुण्यसंचय, त्यांच्याकडेच देवांनीं पाठीं फिरविल्या तर देवांना आधीं देवपण सोडावें लागेल! जा. दौलती, जलदीनें आधीं बाळराजांना घेऊन ये जा. [दौलती जातो.] चिमुकल्या बाळराजांनाही राजांसमोर नेऊं या. मायेचा जिव्हाळा ओलांडून राजांना खात्रीनें गड उतरवणार नाहीं. शाहीर, बाळराजांना घेऊन कुलस्वामिनीचा भंडारा लेऊन आम्ही राजांची मुलाखत घेतों. तुम्ही फिरून खलबतखान्याकडे जा. आणि नवलविशेषीं इकडे तत्काळ खबर द्या बरें! [पडदा पडतो.

---

# प्रवेश तिसरा

[स्थळ—आंबराईतील एक भाग. पात्रें—कलुषा प्रवेश करतो.]

कलुषाः—काय अजून संभाजीचा ठिकाण नाहीं! मग इतका वेळ तुळशी करते आहे तरी काय? रात्रीं खलबतखान्यांत, उद्यां संभाजीला गडाबाहेर काढतों असें शिर्क्यांना दिमाखानें सांगितलें खरें! पण मघांपासून मासाहेबांच्या महालीं उडालेल्या धांदलीवरून मलाच जिवंत समाधी घ्यावी लागणारसा घोर बितला आहे जिवाशीं! घटोत्कचानें अवघ्या रात्रींत मायेचा बाजार भरवावा तसा ह्या खंड्यानें अकल्पित माझ्या फंदफितुरीचा संगतवार छडा लावला तरी कुणाकरवीं? राजारामाविषयीं आधींच संशयी बनलेल्या संभाजीच्या माथ्यावर, काल आणखी मीं शिर्क्यांच्या फंदफितुरीचे रसरसीत निखारे रचल्यापासून, त्याच्या मनःसंतापानें कसा आतां पेट घेतला आहे. ह्याच भडक्यांत आतां मुद्यापुराव्यानें

राजारामराजांच्या फंदफितुरीची शाबिती करून देतों, अशी फुंकर घालून ह्याच घडीला त्याला गडाबाहेर काढला पाहिजे. [तुळशी येते.] वा, वा, वा! तुळशी, आल्या संधीचा फायदा उठवायचे वेळीं खुशाल त्या संभ्याच्या गळयाला मिठ्या मारण्यांत गुंतलीस! छे, छे, छे! भल्या माणसानें तुम्हां पोरींचा भरंवसा धरूं नये.

**तुळशी**:—भल्या माणसानें धरूं नये! पण तुम्हाला काय हरकत?

**कलुषा**:—अशा आणीबाणींत तुला थट्टा सुचते! हं, हांस! हांस! खुशाल फिदिफिदी हांस! करूं नये तें धाडस केलें आहे. आतां ह्याच घडीला संभाजीला गडाबाहेर काढला नाहीं तर सगळ्यांचेच मुडदे गाडले जातील हें ध्यानांत धर!

**तुळशी**:—कब्जी, माझ्या बाबांना ज्यानें देशोधडीला लावून ठार केलें, तो हा आडदांड संभाजी बिनधोक धोक्यांत येत असतां, घडीभराच्या रंग-ढंगाला बळी पडून मी गळफांस लावून घेईन? ही फर्जंदाची पोर सुखा-सुखीं कुणाच्या गळीं पडणारी नव्हे बरें? आजवर सासुरवासिणीचीं लेणीं ल्यालें, रंडकेपणांतही नव्या न्हाणुलीचे चाळे केले; त्यासारखें स्वारीला गडाबाहेर काढीन तर होय म्हणा!

**कलुषा**:—पण कधीं? जीव गेला नि वैदू आला, असंच ना?

**तुळशी**:—बिशाद तसें होईल! गडावरच्या फितुरीनें स्वारी बेफाम बनली तरी माझीं रुसणींफुगणीं चालूच आहेत. आतां तरी मी रुसूनच आलें आहे इकडे.

**कलुषा**:—दौलतीला धोका असल्यावर तुझ्या रुसण्याफुगण्याची पर्वा करण्याइतका तो ढिला शिपाई आहे असें समजू नको. त्याच्या संशयी वृत्तीचाच उपयोग करून घेऊन ह्याच घडीला त्याला आधीं गडाबाहेर काढला पाहिजे. मासाहेबांना आपल्या फितुरीचा छडा लागला आहे समजलीस?

**तुळशी**:—अगबाई, खरं कीं काय?

**कलुषा**:—ही घाबरून जाण्याची वेळ नव्हे! जिवाशीं बेतल्यावरच माणसानें निगरगट्ट बनावें लागतें. संभाजी कुठें आहे?

**तुळशी**:—इकडेच येतो आहे इतक्यांत! पण त्याला बेपत्ता करायचा म्हणजे तरी काय?

**कलुषा:**—शिर्क्यांकडून बादशाही शिक्कामोर्तबानें जहागिरीची सनद हातीं पडेपर्यंत कुठेंतरी आडवळणाच्या निवाऱ्याला गुंगवून ठेवायचा!

**तुळशी:**—पण मी म्हणतें, एवढीं कारस्थानें करून पुन्हा आडवळणाच्या निवाऱ्याला ह्याला न्या, मसलती गुप्त ठेवा, ह्या भानगडी हव्यात कशाला? गडाबाहेर पडायची खोटी, संभाजीला सरळ सरळ शिर्क्यांच्या स्वाधीन केला म्हणजे झालें.

**कलुषा:**—छे, छे! असा ढिला कारभार लागी नाहीं. गणोजीच्या मनांत कांहीं काळेंबेरें आलें तर हांहूं जाऊन धुपाटणें हातीं येईल! उद्यां उलटी अंबारी धरून देशोधडीला लागावें लागेल आपल्याला!

**तुळशी:**—कब्जीचें आपलें भारीच! शिर्के असे वचनाला उणें आणणाऱ्यांपैकीं नव्हेत बरें!

**कलुषा:**—गणोजी वचनाचा मोप हरिश्चंद्र असेल; पण कुणाला? जो कधीं कुठें त्याच्या वाटेस गेला नाहीं त्याला; पण एकदांका त्याची आगळीक केली, कीं त्यानें सापासारखा डूक धरलाच! मग मी तर त्याच्या भावा-बंदांच्या कत्तलींत पुढाकारानें वावरलेला संभाजीचा साथीदार! मला रोखठोकच नको वागायला त्याच्याशीं? पण हा पहा संभाजीच आला! आतां विलंब नको. हो जरा बाजूला.

**तुळशी:**—पण हे पहा, काल मासाहेबांनीं तुम्हाला झालेला दृष्टांत खोटा आहे असें सांगून राजारामाचा बचाव केला, तेव्हांपासून स्वारी पार बिथरून गेली आहे. गुन्हेगारांची उघड पंचाईत मांडून मुद्यापुराव्यानें फितुरीची शाबिती करून द्या, असा एकाएकीं हुकूम होण्याचा संभव आहे. हुशारीनें असा बरें.

**कलुषा:**—त्याची नको तुला काळजी! राजारामाची फितुरी शाबीत करून देण्याच्या निमित्तानेंच ह्याला गडाबाहेर काढण्याची माझी मसलत आहे. ही इथें निशापाण्याची भूल तयार आहे; कारस्थानाच्या मंत्रानें भार-लेलें तुझ्यासारखें मोहिनीअस्त्र त्याच्यावर सुटलें आहे. आतां हा भरला वार वायां जावूं देत नाहीं. तूं हो बाजूला.

[ **तुळशी** जाते. **कब्जी** बाजूला होतो. **संभाजी** राजे प्रवेश करतात.]

**संभाजीः**—राजारामराजे फितुर नाहींत! राणीसाहेब, राजारामराजे फितुर नाहींत असा निर्वाळा आपणाला देववतो तरी कसा? स्वारांशिबंदीनें गड सज्ज असतां फंदफितुरीशिवाय शिर्क्यांचा तटबंदींत शिरकाव व्हावा कसा? गडाच्या बंदोबस्तीवर ज्याचा ताबा तो किल्लेदारच शिर्क्यांच्या फंदफितुरीची दखलगिरी नाहीं असें दाखवून, ज्यांच्या मातेला आम्हीं भिंतींत चिणली त्या राजाराममहाराजांच्या महालीं बेगुमान बाता झोकीत असलेला आढळतो, घाईघाईनें दौडत असतां आम्हाला पाहतांच चोरासारखा तोफखान्याचा आडोसा घेतो; तेव्हां पक्षपाती शिर्क्यांच्या फितुरींत राजारामराजांचें अंग असलेंच पाहिजे असें आम्हीं कां मानूं नये? अरेरे! आमच्या गेल्या नऊ संवत्सरांच्या कारकीर्दीचें आम्ही सिंहावलोकन करूं लागलों, तर एक रक्तपाताशिवाय कांहीं कांहीं दिसत नाहीं. घरीं घरभेद आणि बाहेर हाणामाऱ्या. रातबेरात न बघतां पहाडाजंगलांतून कडेकपाऱ्या तुडवल्या, कधीं अन्नावांचून उपातापाशीं, तर कधीं घोड्यावरच्या घोड्यावरच कोरड्या भाकरीचे घांस गिळून मुलखोमुलखीं लढाया मारल्या; लक्षावधि फौजेच्या बळानें आम्हांवर कोसळलेला औरंगजेब आम्हीं हैराण केला; आणि अजूनही दे माय धरणी ठायसा त्याचा खुर्दा करूं असा नसांनसांतून जोम उसळतो आहे आमच्या! पण आमच्याच सोयरेधायऱ्यांच्या ह्या घरभेदेपणाकडे पाहिलें, कीं वैतागीनें नाड्या कशा जिथल्या तिथें जखडून जातात! कर्त्या पुरुषाला स्वकीयांनींच विरोध करावा यापरतें दुर्भाग्य तें काय असावयाचें! किती काळ ही कुचंबणा सोसावी? राजारामराजांची फंदफितुरी मुद्यापुराव्यानें शाबीत करून त्यांचा एकदां पक्का बंदोबस्त केल्याविना, आणि कत्तलींतून फरारी झालेल्या शिर्क्यांचा माग काढून त्यांना जिवंत गाडल्याविना ह्या घरभेदाच्या गांजणुकींतून आमची कायमची सुटका होईल असें दिसत नाहीं. [ कब्जी पुढें येतो.

**कलुषाः**—जगदंब, जगदंब, जगदंब!

**संभाजीः**—कब्जी!

**कलुषाः**—जी हुजूर.

**संभाजीः**—राजारामराजांच्या फितुरीबाबत तुम्हीं सांगितलेला दृष्टान्त सत्य आहेना?

**कलुषाः**—सत्य ! त्रिवार सत्य ! कब्जीच्या सचोटीची शंका येते महाराजांना ?

**संभाजीः**—तुमच्या सचोटीची शंका नाहीं आम्हांला; देवीचा दृष्टान्त समजून येण्यांत कांहीं गोंधळ उडालेला नाहीं ना ?

**कलुषाः**—राजकारणाच्या जोखिमदारींत अशी घिसाडघाई न करण्या-इतकी कब्जीला अक्कल आहे, हें खाशांना सांगावे असें नाही. महाराजां-सारखे प्रभावशाली प्रभु जोंवर तक्तनशीन आहेत, तोंवर दृष्टान्तांतला बोलन् बोल सचोटीला उतरेल !

**संभाजीः**—अलबत् उतरेल ! मात्र घडल्या दृष्टान्ताची सचोटी पटवून देण्याची जबाबदारी तुम्हां शिरीं आहे हें ध्यानांत घ्या म्हणजे झालें !

**कलुषाः**—जगदंब, जगदंब ! हुजूर, मूर्तिमंत महिषासुरमर्दिनीचा दृष्टान्त घडल्यावर, नास्तिकागत त्याला पुरावापुराव्याचा कस लावावयाचा ? छे, छे, छे ! सरकार, दृष्टान्ताबाबत मनीं अशी संशयाची बाधा कदापि दाटूं देऊं नये. दृष्टान्त तो दृष्टान्त ! त्याची पुराव्यापुराव्यानें कां कधीं कसोटी पटते ? दृष्टान्तानुरूप वर्तन केल्यानेंच त्याची सचोटी पटते. सरकार, ही भक्तीचीमिरास आहे. ती श्रद्धेनेंच साध्य व्हावयाची. आणि महाराजांनीं तर अत्यंत श्रद्धाळू असलें पाहिजे. कारण मराठेशाहीवर देवीची कृपा-सांवली पाहिजे.

**संभाजीः**—कब्जी, भवानीच्या चरणीं आम्ही पूर्ण श्रद्धाळू आहों. तूर्त श्रद्धेचा लढा नाहीं. तर दृष्टांत समजून घेण्यांत तुमचा कांहींतरी गोंधळ उडाला आहे, अशी राणीसाहेबांची समजूत आहे. आणि ह्या त्यांच्या शंकेचें निरसन करायचें, म्हणजे दृष्टांतानुसार खरोखरच राजारामराजे फितुर आहेत असें प्रत्यक्ष पुराव्यापुराव्यानें शाबीत झालें पाहिजे.

**कलुषाः**—एकूण गुन्हेगारांनींच उलटून जोर बांधला अं ! प्रत्यक्ष मासाहेबच गुन्हेगारांच्या कैवारी, मग गुन्हेगारांची गुन्हेगारी कशी शाबीत करून द्यावी ?

**संभाजीः**—कां बरें ? आम्ही पाठबळ देतों आहों ना तुम्हाला !

**कलुषाः**—नाहीं निभणार हुजूर ! पाण्यांत राहून माशांशीं वैर कसें पत्करावें ! शिवाय दृष्टांताची सचोटी अशी पटवावी तरी कशी ? मालोजी-

राजांना तुझ्या कुळीं अवतारी पुरुष निर्माण होईल, असा देवीचा दृष्टान्त घडला. त्यांना कोणी शंकेखोर 'दृष्टान्ताची सत्यता पटवा' असा सवाल करता, तर ते जसें त्याकाळीं त्याच्या हातीं नव्हतें, तीच हताश गत आज़ आमची ! आणि त्यांतूनही दृष्टान्ताची सत्यता पटविली तरी गुन्हेगारांना सजाच द्यावयाच्या ना सरकार ? मग हुजूरना त्या आतांही फर्मावतां येतील !

**संभाजीः**—कब्जी, संभाजी शिपाई झाला म्हणून त्यानें मुत्सद्देगिरीला अगदींच फांटा दिला असें समजूं नका. राजांचें राजेपण रयतेच्या दिलजमाईवर अवलंबून असतें. हें न उमजण्याइतके आम्ही खचित नादान नाहीं. वडील पुत्राच्या नात्यानें दख्खनदौलतीचा धनीपणा संभाजीराजांकडे यावा हें पूर्वपरंपरेनें सिद्ध होतें; म्हणून आम्हीं पूर्वी केलेल्या मातबरांच्या कतलीकडे रयतेनें काणाडोळा केला. पण आज अलमगिरासारखा बादशहा लाखो फौजेनें शह देऊन दक्षिणेंत खडा असतां, आणि राणीसाहेबांसारखी साध्वी गुन्हेगारांचा निर्वाळा देत असता, बिनपंचाइतीनें राजारामराजांना सजा फर्मावायची सुलतानशाही आम्ही गाजवूं तर रयतेंत बेदिली माजून दौलतीची धुळधाण उडाल्याविना राहणार नाहीं. तेव्हां गुन्हेगारांना सजा फर्मावायची ती उघड पंचाइतनेंच फर्मावली पाहिजे, आणि म्हणून मुद्यापुराव्याची आटाआट केली पाहिजे समजलांत ?

**कलुषाः**—पण बलवंतांशीं असें कसें वैर पत्करावें गरिबानें ? जीव रहात नाहीं. आंधळें दळतें आणि कुत्रें पीठ खातें अशी विपरीत अवस्था खाशांच्या कपाळीं आलेली बघवत नाहीं; म्हणून कष्टानें फारतर इतकी सल्ला देऊं, कीं ह्या प्रकरणीं खाशांनीं बाईलबुद्धीनें वागूं नये ! नाहीं; तशा मासाहेब चतुर आहेत, प्रति जिजामातोश्री आहेत ! तथापि स्त्री आहेत हें विसरून निभाव नाहीं. स्त्रियांच्या भोळेपणाला पुरुषांच्या अकलमंदीचा ठाव कसा लागेल हुजूर ? बाकी बायकांच्या भोळ्या मसलतींना गळीं बितलेल्या राजकारणांत कितपत मान द्यायचा ह्या नाजूक बाबीचा खाविंदानींच विचार करावा. आम्हां गरिबांना हे इंगळाचे खेळ काय लाॅगी !

**संभाजीः**—राणीसाहेबांचा केव्हां किती मान राखायचा असला·लांडा कारभार आम्ही तुम्हांला पुसला नाहीं. गुन्हेगार तुम्हीं दाखवून दिलेत. तुम्ही त्यांची गुन्हेगारी शाबीत करा म्हणजे झालें.

**कलुषाः**—कशी करूं महाराज ! थोरांच्या झुंजेंत गरीब हकनाक चिरडला जाईल नव्हे सरकार ?

**संभाजीः**—कब्जी, इतके ढिल्या तब्बेतीचे आहां तुम्ही ? दिसण्यांत मारे अघळपघळ; वाघाच्या जबड्यागत खाऊं कीं गिळूं असा आव घालून भ्याडभेकडागत माघार खातां ?

**कलुषाः**—चाकर लाचार आहे खाविंद !

**संभाजीः**—मग घरभेदाचा वणवा आतां राजवटीशीं भिडला असतांना तुम्ही अवचित ~~असी बमक~~ काढणार ? एकूण आमच्या जिवाचा घोर दुणावतच जाऊन कालची मारहाणही आमच्या दुर्लौकिकालाच कारण होणार म्हणायची तर ! वाहवारे दुनिया ! कधीं कधीं मनाला असा दारुण उद्वेग येतो, कीं ह्या लटक्या दौलतीवर लाथ मारून आपणच कुठें तरी काळें तोंड करावें. पूर्वपुण्याईनें आम्ही आबासाहेबांच्या पोटीं निपजलों, असें दुनिया लागेल तर चाहेलशी बरळो; पण आम्हांला तर आमच्या हयातींतला कपाळकरंटेपणा पदोपदीं बजावीत असतो, कीं 'राजा, पूर्वजन्मींच्या पातकांचे झाडे देण्याकरितां भोंसल्याच्या थोर कुळीं तूं जन्मला आहेस !' नाहींतर तीर्थरूप आबासाहेबांच्या अस्थींनीं गंगोदकही पुरतें पाहिलें नाहीं तोंच अष्टप्रधानांनीं आम्हाला आजन्म कैदेंत कोंडायचें कारस्थान करावें; आमचा कोंडमारा करणारांना आम्हीं शिक्षा सांगितल्या तर जगांत आमचाच दुर्लौकिक व्हावा; झाल्यागेल्या गोष्टींची कैफानें स्मृति सांडावी; तर दारुडा राजा म्हणून जनानें नाकें मुरडावीं; मावळमाणसांचा भरंवसा येईना, म्हणून परप्रांतींच्या माणसांची मोहोबत करावी तर वेळेवर त्यानेंच असा धोका द्यावा; अशी वक्रगति आमच्या कपाळीं कां येती ?

**कलुषाः**—हं, हं, हें काय हुजूर ! धीराच्या पुरुषांनीं का अशा—

**संभाजीः**—बस् करा कब्जी. तुम्हीं काय धीराच्या गोष्टी सांगाव्या ! तुम्ही एक जिवाला जीव देणारे नेकीचे नेकदार आहां असें आजवर आम्ही मानीत आलों म्हणून यापुढेंही तुमच्या मुलामी नेकदारीचा भरंवसा धरूं असें समजूं नका.

**कलुषाः**—क्षणभराच्या नकारानें एकाएकीं माझ्या नेकदारीला कलंक

लागावा यापरतें दुर्भाग्य तें कोणतें असायचें! हा इमानी चाकर खाशांच्या जिवाला जीव द्यायला कचरेल असें सरकारला खरोखर का वाटलें?

**संभाजीः**—आजवर वाटलें नव्हतें; पण फंदफितुरीनें जीव तळमळत असतां अवचित अंग झाडून नामानिराळे होऊं पहातां, यावरून मात्र वाटतें, कीं खाल्लया मिठाला जागणारी कांहीं ही अवलाद नव्हे!

**कलुषाः**—खाशांची अशी नाहक खप्पा मर्जी होत असेल, गेल्या वीस वर्षांच्या माझ्या चाकरीवर असें पाणी पडत असेल, तर आहे नाहीं तें मंत्रसामर्थ्य एकवटून महिषासुरमर्दिनीच्या महामंत्राच्या सिद्धीनें गुन्हेगारांच्या गुन्ह्याची मुद्यापुराव्यानें शाबिती करून द्यायला मी तयार आहें! पण एक, महाराजांच्या मनावर मासाहेबांच्या चारित्र्याचा कांहीं विलक्षण दाब आहे म्हणून धाडसानें विनंती करतों, कीं हुजूर ह्या चाकराच्या कांहीं अटी पाळायला राजी आहेत का?

**संभाजीः**—योग्य अटी अलबत् मान्य करूं. तुम्ही मुद्यापुराव्यानें छडा लावा किंवा हेरांचें जाळें विणा, गुन्हेगारांचा गुन्हा मुद्यापुराव्यानें शाबीत झाला कीं बस् झालें!

**कलुषाः**—योग्य त्याच अटी घालीन; पण दिलगिरीनें जीभ लांबवितों, कीं खाशांनीं तसें वचनीं गुंतलें पाहिजे चाकराच्या.

**संभाजीः**—बेशक वचनबद्ध होऊं! बोला अटी.

**कलुषाः**—मंत्रसिद्धीपावेतों मी नेईन त्या गुप्तस्थळीं महाराजांनीं ह्या क्षणीं आलें पाहिजे. आणि आपण कुठें जातों ह्या गोष्टीचा कुणालाही—मासाहेबांनासुद्धां—मागमूस लागतां कामा नये. बंदोबस्तीला माझ्या भरंवशाचे शिपाईप्यादे मी घेतों. तुम्हीं कोणतीही काळजी बाळगण्याचें कारण नाहीं.

**संभाजीः**—ठीक आहे. तुम्ही न्याल तिकडे यायला या क्षणीं आम्ही तयार आहों. या मसलतीचा बिलकुल स्फोट होणार नाहीं. आमची जबान हेंच वचन समजा आणि आधीं घोडयांची वर्दी द्या.

**कलुषाः**—जी! कोण आहेरे? हुजऱ्या! [हुजऱ्या येतो.] मोतदाराला घोडयांची वर्दी दे! [हुजऱ्या जातो.] देवीचा प्रसाद घेऊन निघायचेंच

सरकार ! जगदंब, जगदंब ! [पेला भरून देतो.] तुळसाबाईनाही असूं द्यावें बरोबर नाहीं सरकार ?

**संभाजीः**—हां, हां. ऐसा रंगेला जनाना जरूर मंगते है हम ! कुठेंतरी फेरफटक्याला निघावें असा रुसवाच आहे त्यांचा.

[दारू घेत असतां **येसूबाई, बाळराजे** व **खंडूजी** येतात.

**शिवाजीः**—कब्जी, काय देतां आहां महाराजांना ? मासाहेबांची स्वारी झाली, चालते व्हा पाहूं आधीं ! कब्जी, अजूनही रेंगाळतां तुम्ही ? मासाहेब उभ्या आहेत, दिसत नाहीं तुम्हाला ! चालते व्हा आधीं. मासाहेबांची स्वारी होते आहे महाराज !

**संभाजीः**—बाळराजे ! कब्जीसारख्या संभावितांना येथें असायला काय हरकत ?

**शिवाजीः**—कब्जीच्या संभावितीची शंकाच नाहीं कुणाला ! पण कोणाही परकी पुरुषाकरतां गोषा असतो असें मासाहेब म्हणतात. आणि अजूनही त्या दूर उभ्या आहेत.

**कलुषाः**—हं, हं, हं ! छान पोपटपंची केली बाळराजांनीं !

**शिवाजीः**—कब्जी ! कुणाची बेअदबी मांडली आहे तुम्हीं ?

**खंडूजीः**—कब्जी, अजूनही बाळराजांची अदबी राखीत नाहीं तुम्ही ? हुजुरांना निशेनें बेहोप बनवून बाळराजांचा अपमान करीपर्यंत तुमच्या माजोरीपणाची मजल गेली ! ज्यांच्या पायपोसापाशींही उभें रहाण्याची तुमची लायकी नव्हे त्यांच्या राजवटींत, त्यांच्याच बागबगीचांत धडधडीत त्यांच्यासमोर बेमुर्वतीची वागणूक करितां, शरम नाहीं वाटत ? राजांशिवाय इतर दुनिया न मोजण्याइतकी तुमच्या मतलबी डोळ्यांवर धुंदी चढली ? आजचा हा राजपुत्र उद्यांचा राजाच आहे ! आजच्या ह्या पालवीचीच उद्यां सगळ्या महाराष्ट्राला सांवली होणार आहे हें जाणूनबुजून विसरण्याइतके बेफाम बनलांत ! आतां क्षणाचाही विलंब न लावतां बाळराजांपुढें नाक घांसून कसूरीची माफी मिळवा, नाहींतर इथल्या इथें गर्दन उतरली जाईल ! [तरवार उपसतो.

**संभाजीः**—खंडूजी !

**कलुषा**:—हं, हं, हं! जाऊंद्या सरकार! खंडूजी, तुमच्या इमानदारीचें खरोखर कौतुक करावेंसें वाटतें; पण थोडे उतावळे आहांत. परवानगीनें मी या ठिकाणीं उभा आहें! कां उगीच तुमचें ताजें रक्त असें उसळतें आहे?

**येसूबाई**:—कुणाच्या परवानगीनें उभे आहां?

**कलुषा**:—राजराजेश्वरांच्या परवानगीनें उभा आहें!

**येसूबाई**:—आणि आम्ही येत असतां खाशांनीं अशी परवानगी दिली?

**संभाजी**:—होय राणीसाहेब! आम्हीं परवानगी दिली! कब्जीसारख्या स्वामिनिष्ठादेखत गोषा कशाला?

**येसूबाई**:—जशी महाराजांची मर्जी. हा टाकला बुरखा! ( बुरखा टाकून पुढें येतात ) खंडूजी, क्षत्रियाचा बच्चा आहेस! समशेर उपसल्यावर तिला नाट लावणें बरें नाहीं. स्वतःच्याच करंगळीचें रक्त देऊन ती म्यान कर! आणि कब्जीसारख्या इमानदाराचा अपमान केलास ह्याबद्दल त्यांच्यापुढें नाक घांसून त्यांची क्षमा माग!

**शिवाजी**:—असा कसा उलटा न्याय मासाहेब! खंडूजीनीं कां क्षमा मागायची?

**येसूबाई**:—चूप रहा बाळराजे! जन्म झाला नाहीं तोंच आपण असा सूर्यबिंबाला हात घालूं नये. आटप खंडूजी!

**खंडूजी**:—कब्जी! आपल्यासारख्या स्वामिनिष्ठाचा उतावळेपणानें मीं अपमान केला, क्षमा करा!

**येसूबाई**:—कब्जी, झाली तुमची अपमानभरपाई? खंडूजी, स्वारीशीं आम्हाला कांहीं खासगी बाबत बोलायचें आहे. मेण्याजवळ जाऊन उभा रहा. तसेंच कब्जी, तुम्हीही चालते व्हा पाहूं इथून!

**कलुषा**:—महाराजांची काय मर्जी आहे?

**संभाजी**:—नाहीं. कब्जी आज इथेंच रहातील!

**येसूबाई**:—काय विपरीत बोलणें हें! महाराजांना आम्हांपरीस कब्जींची मातब्बरी वाटली? चाकरापायीं स्वारीनीं आमचा पाणउतारा

करावा ? छे, छे! महाराजांच्या जिभेला असलीं वेडींवांकडीं उत्तरें पेलायचींच नाहींत! कब्जी, स्वारी प्याल्यासवरल्या स्थितींत आहे; अंगावर नशा येते आहे. आतांच्या बेशुद्ध हुकुमाची कदर न करतां चालते व्हा इथून!

संभाजीः—नाहीं; सबूर कब्जी! राणीसाहेब, बांका वखत आणलात आपण! आम्ही शराबीनें धुंद झालों आहों, अशा वेळीं आमच्या मुलाखतीला कां येणें केलें? कब्जी, हलूं नका हं! राणीसाहेब, मघांपासून आमच्या मनाला आम्ही बजावतों आहों, कीं 'मना, ही राजलक्ष्मी तुझ्यासमोर आली आहे. ही साध्वी तुझ्याकडे पहाते आहे. कैफांत कांहीं वेडेंवांकडें बडबडूं नको'. पण आमच्या मनावरचा ताबा आतां उडत चालला आहे. कैफांतही आमच्याकडून आपला अपमान व्हावा असें आम्हाला वाटत नाहीं. आल्या पावलीं आपण बाळराजांना घेऊन राजवाड्याकडे परता! आम्ही कब्जीबरोबर चालते होणार! चला कब्जी.

येसूबाईः—कुठें चालते होणार? महाराजांना कब्जी कोठें नेत आहेत?

कलुषाः—सहज शिकारीला!

येसूबाईः—शिकारीला? कसल्या शिकारीला कब्जी? अशा बेभान स्थितींत राजांनीं शिकार तरी कशी करायची? तुम्हांलाच कसली शिकार साधायची नाहीं ना?

कलुषाः—छे, छे! आम्हां कंगालांना हें स्वाऱ्या-शिकाऱ्यांचें वेड कुठून असायला? महाराजांच्याच मर्जीनें शिकारीचा बेत मुक्रर झाला!

येसूबाईः—कब्जी! असें धडधडीत खोटें बोलवतें तरी कसें तुम्हाला? पृथ्वीला पातकाचा भार सहन होत नाहीं. येथें तुम्ही किती काळ तराल! आतां इथें शिकारीचा बेत मुक्रर झाला? मारा पाहूं स्वारीच्या पायावर हात, कीं आतां इथें शिकारीचा बेत मुक्रर झाला म्हणून!

कलुषाः—मासाहेब! कब्जीला तीन तीनदां शब्द बदलतां येत नाहींत! एकदां तेच दहादां! मग हें शपथेचें सोंग कशाला? खोटें वाटत असल्यास मासाहेबांनीं महाराजांची साक्ष घ्यावी!

येसूबाईः—कब्जी, साक्ष भरण्याइतकी खाशांना शुद्ध असती तर तुम्हाला अशी निर्लज्जपणानें जीभ लांबवितांच आली नसती. बाळराजांचा

अपमान केलात त्याचक्षणीं खंडूजीच्या समशेरीनें तुमची गर्दन मारली असती, पण दुर्भाग्य आमचें, कीं ह्याच घडीला स्वारी कैफाच्या आहारीं गेली! कब्जी, कां उगीच असा खोटेपणा करतां? तुमच्या पाताळयंत्री डोळ्यांत शिकारीच्या साधेपणाऐवजीं कपटाची क्रूरता तळपत असतां, लटक्या बडबडीनें आमचें समाधान कसें होणार? तुम्हाला तुमच्या पूर्वजांची शपथ आहे. आजवर राजांच्या ताटाला ताट लावून जेवीत आलांत त्या दूधभाताची तुम्हाला आण आहे! महाराजांना तुम्ही कोठें नेतां आहांत एवढें आम्हांला खरें खरें सांगा! खरें बोलल्यानें शिक्षा भोगावी लागेल अशी धास्ती बाळगू नका. आम्ही क्षमा करूं! तुम्हीं कसलाही गुन्हा केलेला असलात, प्रत्यक्ष राजांच्या जिवाचा बाजार मांडला असलात तरी देखील क्षमा करूं; पण राजांना आज तुम्ही कोठें नेतां आहांत एवढें आम्हाला सांगा! आमच्या साध्या शब्दांचा भरंवसा येत नसेल तर बाळराजांच्या रक्ताची आण वाहून भरंवसा देतों, कीं आम्ही तुम्हाला क्षमा करूं. पण राजांना कुठें नेतां आहां एवढें आम्हाला सांगा!

कलुषाः—धन्याशीं बेइमानी करण्याचें ज्यांना बाळकडू पाजलें असेल अशांच्याही आंतड्याला पीळ पाडणारीं भाषणें मासाहेबांनीं आम्हांसमोर कां करावीं समजत नाहीं! मासाहेब, खरोखरच आम्ही शिकारीला जात—

**संभाजीः**—कब्जी! खबरदार! रा—णीसाहेबांशीं खोटे-पणा क-राल त-र! आमच्या-ग-ळ्यांतले ताईत, ना-कांतले बाल झालां-त म्हणून तुम-चा खोटे-पणा खपवून घेऊं असें मात्र समजू नका. शूराला शत्रू इतकीच खो-ट्याची चीड अ-स-ते हें ल-क्षां—त ठेवा! राणीसाहेब! आम्ही खरोखरच शिकारीला जात नाहीं.

येसूबाईः—अहाहा! काय ऐकतों आहां हें? अमृताचे बोल, कीं आकाशवाणी! शेवटीं महाराजानांच आमची दया आली! आमची पुण्याई सफल झाली! नीचा, पूर्वजांची शपथ मानली नाहींस; दीनवाणीच्या करुणेनें द्रवला नाहींस; प्राणांतींही घेऊं नये त्या एकुलत्या एका लेंकराच्या रक्ताची आण वाहिल्यावरही खरें बोलला नाहींस; पण सत्याला सप्तपाताळीं दडवलेंस, दारूच्या धुंदींत बुडवलेंस तरी तें बाहेर पडल्याविना रहात

नाहीं हें लक्षांत घे आणि आतां तरी खरें बोल, कीं महाराजांना तूं कोठें नेतो आहेस ?

**कलुषा**:—मासाहेब ! कब्जी नेहमींच सचोटीनें वागत असतो. कब्जी सच्चा नसता तर मराठ्यांच्या दरबारीं ह्याला प्रधानपदाची पायरी चढतांच आली नसती. मासाहेबांशीं मी आतां लटकेपणानें बोललों खरा; पण तें लटकेपणानें लटकें बोललों नाहीं तर सचेपणानें. राजकारणांत कधीं कधीं सत्यनिर्णयासाठीं असत्याचाही अंगिकार करावा लागतो हें मासाहेब जाणतातच.

**येसूबाई**:—आम्हांशीं लटकेपणा करावा असें कोणचें राजकारण वायां चाललें होतें ?

**कलुषा**:—मी त्याचा असा अवेळीं उच्चार करणार नाहीं. कैफाच्या भरांत वचनभंगाचें पाप पत्करून गोतावळ्यांतच रेंगाळायचें असेल, मसलतीचा स्फोटच करावयाचा असेल तर हुजूरनीच खुशाल करूद्या.

**संभाजी**:—कब्जी, अशी-तेढी-व-डबड-करणा-रा तुम्हांहून निराळा धा—धा-डसी-असता-त-तर ज-जबान-छाटली-अ-सती ! सभा-जी ला वच-व-चन-भंगा आची ओळख नाहीं ! चला घो-घोड्या-वर स्वार-व्हा ! राणीसाहेब, आतां थांबा-य-यला फु-फुर-सत नाहीं. दिल गि-गिर-र आहों ! लवकर-रच मु मु-लाखतीला ये-येऊ आ-आ-पल्या.

**येसूबाई**:—लवकरच मुलाखतीला येऊं ! ही राजवटी उतरून गेल्यावर ह्या काळाच्या मगरमिठीतून राजाची सुटका होणार ? ह्या यमदूताच्या गळफांसांतून स्वारी मुक्त होणार ? नाहीं, महाराज, नाहीं ! ह्या रायगडाच्या पंचक्रोशीबाहेर पाऊल पडायची खोटी; तेंच सरतें पाऊल ठरेल ! ह्या राजस रूपाचें पुनरपि दर्शनही दुर्मिळ होईल !

**संभाजी**:—ह ! हं ! काय—बर-ळ-तां -रा-रा—णीसाहेब ? कब्जी कु—ठे-नेत-आहे-त- त आ म्हाला अस समजतां ?

**येसूबाई**:—जिथे गेल्यावर ह्या छत्रपतींची जीवनयात्रा संपुष्टांत येईल, जिवलग जीवांच्या गांठीभेटी अंतरतील, भाळींचा कुंकुमतिलक पुसटला जाऊन बघवणार नाहींसें हें कपाळ पांढरें फटफटीत होईल अशा मृत्युमुखीं लोटण्यासाठीं हा चांडाळ राजांना नेतो आहे ! या कसाबानें दहा लाखांच्या



संभाजी:—"—कब्जीतर कधीं नाहींच बेमान ठरले; पण कब्जींना बेमान म्हणणारे मात्र वारंवार आमच्या

जहागिरीचें मोल घेऊन राजांच्या राजबिंडया देहाचा दुष्मनाला विक्रा केला आहे !

**शिवाजीः**—आतां नाहीं ऐकवत आम्हांला हें ! मासाहेब हुकूम होऊं द्या; इथल्या इथें ह्या कब्जीची गर्दन उडवतों आम्हां !

**संभाजीः**—चूप व्हा बाळराजे ! नाहक गैरसमजूत झाली आहे राणीसाहेबांची ! आपणांवर त्याचा परिणाम होऊं देऊं नका ! कब्जींच्या—बेमानी—ब—द्दल—हय—यातभर अशा बड-बडी आम्ही ऐ—कतों आहों ! कब्जी तर—कधीं—नाहीं—च बेमा-मान—ठरले—पण—कब्जी—ना—बेमान म्ह—म्हणणारे मा- मात्र वारवार आमच्या—धुळ—धुळधाणीला उ—उ—द्यु—क्त होत आ—आले आ—हे—त ! राणीसाहेब, आम्हीं इत—इतका—बे—ळ आप—आपल्या चा-चारि—चारि—त्र्याची शो—भा ग—ग्वली, ती तुम्हीं अ—आशी- बे—एताल बड—बडबड क—क—रावी म्हणून न—नव्हे ! निमुट रा—ज—वाडयाक—डे पर—त जा. आ—आम्हीं कब्जी बरो—ओबर गेल्या—विना—रं हा-णार नाहीं !

**येसूबाईः**—नाही, आम्ही कधीही जाऊं देणार नाहीं. तळहातावर शिरकमळ घेऊन सदा समरांगणीं उडी घेणाऱ्या क्षत्रियाच्या पोटीं आमचा जन्म झाला आहे. अवघे सोळा वर्षांचे वय झाले नाहीं तोच म्लेंच्छाशीं झुज घेणाऱ्या शककर्त्याची मी लाडकी सून आहे. राजे नाहीत त्या राजवाड्यांत परतून उद्यां वैधव्याचे दुर्दिन कंठीत रहाण्यापेक्षा राजाना मायेचा खोडा घालून इथल्या इथे आम्ही असे जखडबंद करूं ! साध्वी सावित्रीप्रमाणे पतीचे तरी प्राण वांचवूं किंवा स्वतःचे तरी प्राण देऊं; पण ह्या चांडाळाच्या संगतीनें कुठेंही जाऊं देणार नाहीं राजांना !

**संभाजीः**—बायकांच्या असल्या भाबड्या मायेत गु-रफटू—टून—जाण्या—इत—के आम्ही खचित निर्बल नाहीं. वचन—भंगा—भंगाचे पाप पा—पातक—क—रून आप—ला मान—रा—राखण्यापे—पेक्षा, आपल्यालाच असें—लाथा—डून वच—ना—नाची चा—चाड रा—खणे आम्हाला अधिक पुरुषार्थाचे वाटतें. चला कब्जी ! [ जातात.

**येसूबाई**:—जगदंबे! तूंच एक आतां तारण करणारी! खंडूजी [**खंडूजी** येतो.] सामोपचार संपला. सगळेच उपाय हरले! समशेरीविना आतां इलाज नाहीं! आटप! खंडूजी, भिडव घोड्याला घोडा! आणि उडव त्या चांडाळ कब्जीची गर्दन!

**खंडूजी**:—जय जयभवानी. [ **खंडूजी** तलवार सरसावून धांवतो.

## अंक दुसरा समाप्त

# अंक तिसरा

## प्रवेश पहिला

[ **स्थळ**—मोगल सरदाराचा तळ. पात्रें—**गणोजी** व **सूर्याजी**.]

**गणोजीः**—पण संतापाचें मूळ तरी समजूं द्याल कीं नाहीं ?

**सूर्याजीः**—बस्, बस् हें सोंग ! असल्या सोंगानें फिरून फशीं पडायला मी कांहीं भातुकलींतला बच्चा नव्हे ! राजे, नांवाला 'राजे' असा किताब जोडण्याइतका मी बडया बापाचा बेटा नसलों तरी राजेरजवाड्यांच्या संगतींत ह्यानें चार पावसाळे घालवले आहेत !

**गणोजीः**—पण एवढ्या हंबरीतुंबरीचें कारण ?

**सूर्याजीः**—शिर्के, तुमचें बारसें जेवलेलीं वडील माणसें आम्ही. आम्हांवर मात करायचा आव घालतां ?

**गणोजीः**—पण ही माथेफोड—

**सूर्याजीः**—ॲ हॅः ! वहाव्वारे शिर्के ! आपण त्या गांवचे ना शिवेचे असें नाटक चालवलेंत अं !

**गणोजीः**—पिसाळ, कांहीं नशाबिशा तर केली नाहींत ना ? आगापिच्छा कांहींच न समजतां असे बरळत काय सुटलांत ? खरोखरच कसला कैफ करून आलां असाल तर घडीभर धरणीला आंग टाका आणि अक्कलहुशारीनें मुलाखतीला या माझ्या.

**सूर्याजीः**—अक्कलहुशारी ? आतां कुठली बाबा अक्कलहुशारी ! अक्कलेची आणि माझी केव्हांच फारकत झाली. मुकर्रबखानाच्या साथीनें वांईच्या देशमुखीची लालूच दाखवून मला फितुरीची नशा चारलीत, तेव्हांच तिनें मला सोडचिठ्ठी दिली. आतां ती नशा मला इतकी अना-

वर झाली आहे, कीं शंभुराजांनीं माझ्या पाठीची चामडीन् चामडी लोळवली! उद्यां जीवही जाईलसा घोर पडला आहे जिवाला! पहाऱ्यांतून पळून यावें लागलें मला.

**गणोजी**:—म्हणतां काय पिसाळ? आपल्या फितुरीचा बभ्रा झाला?

**सूर्याजी**:—बभ्रा झाला? झाला नव्हे; कपटया, तूं केलास! शेंकडो तोफांच्या माऱ्यानें ज्या किल्ल्याचा दगडही वांकडा व्हायचा नाहीं, त्या रायगडावर तुम्हांला बिनबोभाट पावता करणारा मी, माझ्याशीं बेमानी करून आतां या बोटाची थुंकी या बोटावर नाचवतोस?

**गणोजी**:—पिसाळ, पिसाळ!

**सूर्याजी**:—पिसाळ काय पिसाळ! असल्या धाकानें दबण्याइतका पिसाळ ढिला नाहीं. असे डोळे फाडफाडून पाहिलंत म्हणून पिसाळ डोळ्यांत मावणार नाहीं! तुम्ही समजत असाल, पिसाळ माथेफिरूसारखा एकटाच आपल्या गोटांत सांपडला आहे, ह्याला आपण सहज लोळवूं; पण ही भलती भ्रांत धरूं नका. दिल्या मुदतींत मला रायगड गाठतां आला नाहीं तर तुमच्या फितुरीची खडान् खडा खबर शंभुराजांच्या कानीं पडून कब्जीचा मुडदा गाडला जावा, अशा तरतुदीनें मी तुमच्या मुलाखतीला आलों आहें! शिर्के, माझा एकच सवाल आहे. आधींचा मनसुबा जमेस धरून मोगल माझी मोहोबत राखणार, कीं कब्जीच्या नादानें कब्जीसकट साऱ्या कारस्थानाची माती करून घेणार, बोला?

**गणोजी**:—पण पिसाळ, तुमच्या दोस्तींत आधीं अंतर पाडलें आहे कुणीं; तर जाव द्यावा. मिळेल तितका मराठा मिळविण्याच्या यातायातींत तुमच्यासारखा म्हणूं तसा गरजेला पडणारा किल्लेदार आम्ही दुखवूं कसे?

**सूर्याजी**:—त्याला काय हरकत! कब्जीसारखा मातबर माणूस हातीं लागल्यावर गरीब किल्लेदाराची काय गरज?

**गणोजी**:—पिसाळ, कब्जीइतकीच किंबहुना त्याच्याहूनही अधिक तुमचीच आम्हांला गरज आहे. कब्जी कसाही पाताळयंत्री झाला तरी कारकुनीपेशाचा माणूस! तो फार फार तर सडा संभाजी आमच्या सुपूर्त करील! पण रायगडचा कब्जा करून घ्यायचा, तर मोगलांना तुमच्यासारख्या शिपाईगड्याचीच मोहोबत राखली पाहिजे.

**सूर्याजीः**—असें जर खरें, तर तुम्हांला गडावर घेण्यांत पिसाळाचें अंग आहे अशी शंभुराजांजवळ कब्जीनें चुगली कां करावी हो? माझा त्याचा कांहींच हेवादावा नसतां, तो आणि मी दोघेही मोगलांना फितुर असतां, तुमच्या सांगण्याशिवाय तो मुखासुखीं माझ्यावर आग पाखडील?

**गणोजीः**—काय म्हणतां, कब्जीनें फितुरीचा बभ्रा केला?

**सूर्याजीः**—हो, हो! कब्जीनें केला!

**गणोजी**—असें घडेल तरी कसें?

**सूर्याजीः**—घडेल तरी कसें? शिर्के, अशा उलट्यासुलट्या कोलांट्यांनीं निभणारी ही बाब नाहीं. सुध्यासिध्या चालीनें माझा निभाव लावाल तरच तुमच्या कारस्थानाचा आतां निभाव आहे! नाहींतर कारस्थान आणि कब्जी दोन्ही खतम झालीं म्हणून समजा! तुम्हीं माझें वाटोळें केलेंत तर मीं तरी तुमचें वाटोळें कां करूं नये बाबा?

**गणोजीः**—पण कब्जीच्या चुगलखोरीला आमची फूस असेल असें तुम्ही मानतां तरी कसें?

**सूर्याजीः**—कां मानूं नये? माझ्या नांवाचा बभ्रा करून स्वतःची फितुरी पार पाडणें कब्जीला सोपें जात असेल तर त्याच्यांत मोगलांचा फायदा आहे, तुमची सुडाची इच्छा सफल होणार आहे आणि कब्जीला तर उद्यां बादशहा सुलतानच बनवील! मग कब्जीच्या चुगलखोरीला तुमचा, मोगलांचा पाठिंबा असावा असें मीं कां मानूं नये?

**गणोजीः**—पिसाळ, भलत्या तर्कटानें तुम्ही नाहक माथेफिरूपणा करतां आहां! सुडाची इशीम धरून मोगलांना मिळालों म्हणून साऱ्याच गोष्टींत मी उलट्या काळजानें वागतों असें समजूं नका. निरपराध्यांच्या माना मुरगळून मला कांहींच मिळवायचें नाहीं. आयुष्यांत मला मिळवायचें असेल तर एक सूड! सुडाशिवाय मला दुसरें कांहीं दिसतच नाहीं. माझ्या घराण्याचा नायनाट करणाऱ्या भोसल्यांचीं पाळेंमुळें खणून काढीन तेव्हांच सुखानें मरेन. तुम्ही संशयाच्या वावटळींत गवसलां आहांत; माझ्या शब्दावर तुमचा भरंवसा बसणें मुष्कील. पण माझ्यापरी मी ईश्वरसाक्ष सांगतों कीं, कब्जीच्या चुगलखोरीला आमची मुळींच संमति नाहीं.

**सूर्याजीः**—कब्जीशीं तुमचा कांहीं करार झाला आहे, हें खरें ना ?

**गणोजीः**—खरें आहे. पण तो करार कब्जीनें सडा संभाजी मोगलांच्या सुपूर्त करायचा, असा आहे. रायगडचा कब्जा करून घेण्याशीं कब्जीचा बिलकुल संबंध नाहीं.

**सूर्याजीः**—असें म्हणतां ?

**गणोजीः**—खात्री होत नसेल तर खानसाहेब पलीकडच्याच राहुटींत झोंपीं गेले आहेत तिथें कराराच्या नकला दाखवायला मी तयार आहें.

**सूर्याजीः**—मग कब्जीला अशी वावगी वागणूक करायची गरज काय बरें ?

**गणोजीः**—अहो, मढ्याच्या टाळूवरचें लोणी खाणारा सैतान तो ! त्याचें कसब तुमच्या अटकळीपलीकडचें आहे. कब्जीच्या आणि आमच्या दरम्यान संभाजीला धरून देण्याचे नक्की कररमदार होण्यापूर्वीं तुमच्याशीं आमचें कांहींतरी कारस्थान चाललें आहे, हें तो जाणून होता. तेव्हां त्याच्याशींच फितुरीचा सौदा केल्याशिवाय मोगलांना गत्यंतर उरूं नये म्हणून त्यानें तुमचा असा गळा कापला आहे समजलांत ?

**सूर्याजीः**—ओ हो हो ! खरेंच कीं; ह्या बाजूनें माझा तर्कच धांवला नाहीं. हो बरोबर, अगदीं तुमचेंच बरोबर आहे ! कब्जीचें—एकट्या कब्जीचेंच काम हें ! मग मात्र कठीण अवस्था ! आतां प्राणत्याग किंवा देशत्याग याहून मार्गच राहिला नाहीं म्हणायचा मला !

**गणोजीः**—छे, छे ! पिसाळ, मोगलांना जोंवर तुमच्या मदतीची गरज आहे तोंवर असलें अरिष्ट येईल ही धास्तीच धरूं नका.

**सूर्याजीः**—होय शिर्के; जगायचा आतां तोच एक मार्ग उरला आहे. आणि तोही बोलल्याचालल्याचा राग न मानतां तुम्हीच दया दाखवाल तर ?

**गणोजीः**—माझ्या मदतीविषयीं अगदीं निर्धास्त असा; ज्याचें तोंड पाहूं नये त्याचीच आज फितुरीकरितां मला दाढी खाजवावी लागते आहे खरी; पण कब्जीबद्दलचें माझें वैर मी राखेखालच्या निखाऱ्यागत जिवंत राखलें आहे ! कब्जीची धास्तीच सोडा. चला, तुमच्या बचावाकरितां खानसाहेबांकडून कब्जीला आतांच लखोटा देववतों. कब्जी गडावरच आहेना ?

**सूर्याजीः**—नाहीं.

**गणोजी**:—मग कुठें आहे ?

**सूर्याजी**:—शिकारीच्या सांगानें तो संभाजीसकट कुठें बेपत्ता झाला आहे. पण संगमेश्वरीं असावा अशी शंका येते.

**गणोजी**:—कशावरून ?

**सूर्याजी**:—कलुषाला वाटेल त्या उपायानें गारद करून राजांना गडाच्या बंदोबस्तांत आणण्यासाठीं मासाहेब तांतडीनें संगमेश्वरीं निघाल्या आहेत. आडवाटांनीं झपाट्यानें अंतर कापायचा त्यांचा मनसुबा आहे. मेण्याबरोबर बंदोबस्ताला बराचसा मावळा आहे, पण शेलका लढवय्या आहे; आणि त्यांच्यावर खंडोबल्लाळाची हुकमत आहे.

**गणोजी**:—पण संभाजीला एवढ्या तांतडीनें गडावर परतवायची मासाहेबांना काळजी कां वाटली ?

**सूर्याजी**:—कब्जीच्या फितुरीचा त्यांना वहीम आला असावा! कारण संभाजीनें कलुषाच्या संगतीनें शिकारीला जाऊं नये, दगा आहे; अशी परोपरीनें मासाहेबांनीं संभाजीची आळवणी केली; पण त्यांना लाथाडून बेहोष स्थितींतच तो चालता झाला! अखेरीस कब्जीला ठार करून शिकारीचा बेत हाणून पाडावा, अशा इरायानें खंडोबल्लाळानें बेफाम घोडा दामटून त्याचा पाठलाग केला, पण शंभुराजांपुढें त्याचा नाइलाज होऊन त्याला तसेंच परतावें लागलें.

**गणोजी**:—वा, वा, वा! पिसाळ, कुठें ठेवूं तुम्हाला? लाखांतली खबर दिलीत; माझी सुडाची अर्धी अधिक कामगिरी तुम्हीं पार पाडलीत! कराराप्रमाणें संभाजीला आमच्या स्वाधीन करण्याकरितां कलुषा संगमेश्वरीं आला आहे; पण आतां संभाजीसकट तोही गारद झाला म्हणून समजा! कोण आहेरे पहाऱ्यावर ? डंक्यावर टिपरी टाकून फौजेला इषारा करा. नौबती वाजवा! खानसाहेब, खानसाहेब, अहो खानसाहेब! उठा, कंबर कसा! घोड्यावर स्वार व्हा! किल्लेदार, तुम्ही आतां बिनघोर रायगडीं जा. संभाजीची गर्दन उतरली, कीं मग आपली मुलाखत!

[ **पिसाळ** जातो. **मुकर्रबखान** येतो.

**मुकर्रब**:—राजे, नौबती कसल्या झडून राहिल्या आहेत ? झालें तरी काय असें ?

**गणोजीः**—फत्ते व्हायचा मोका आला खानसाहेब! कराराप्रमाणें कब्जीनें संभाजीला संगमेश्वरीं आणला! अबीके अब्बी कुचाचा नगारा करून हजार समशेरीनें तुम्ही संगमेश्वरावर गर्दी करा. जहागिरीच्या सनदेच्या सबबीवर संभाजीला तुमच्या सुपूर्त करायला कब्जीनें अनमान करूं नये म्हणून सांडणीस्वाराबरोबर आगाऊ निरोप धाडून बंदोबस्त करतों, आणि राणी येसूबाई संभाजीला परतविण्याकरतां रायगडाहून निघाली आहे तिकडे रिसाल्याची दौड करून तिला गिरफदार करतों आणि तुमच्या आधीं संगमेश्वर गांठतों. चलो, दौडो, बोलो दीन, दीन, दीन!

[ जातात.

---

# प्रवेश दुसरा

[ **स्थळ**—संगमेश्वर येथील एक जुनाट वाडा. पात्रें—**शाहीर** व **चंद्रावळ.**]

**शाहीरः**—चंद्रावळ! कब्जीनें मोगलांच्या स्वाधीन करण्याकरितां राजांना या संगमेश्वरीं आणलें आहे, असा रायगडीं सांगावा धाडून आज तीन दिवस झाले आणि गडावरून कोणीच कसे येईना अजून?

**चंद्रावळः**—शाहीरा! दूरचा पल्ला गांठायचा म्हणजे निरोप्याला लागतो आतांपर्ता दिवस.

**शाहीरः**—पण संकटकाळीं माणूस जरा जलदी करणार नाहीं का?

**चंद्रावळः**—ही आपल्या हळव्या मनाची समजूत आहे. साऱ्यांनाच एवढा कुठला कळवळा यायला? त्यांतून आपण मोलांनीं धाडलेला निरोप्या; तो टप्याटप्यानें, ऊनसांवली बघून वाट चालायचा!

**शाहीरः**—घडीघडीनें जसजसा दिवस जातो आहे तसतसा धीर खचत चालला आहे माझा! जिव कसा माशागत तळमळतो आहे!

**चंद्रावळः**—एवढें जिवाचें रान केल्यासारखें देवानें आमच्या राजांना उदंड आयुष्य द्यावें म्हणजे झालें.

**शाहीरः**—नाहींतर चंद्रा, गांवांतन एखादा घोडा पैदा करून मीच रायगडाकडे धावूं का आणखी ?

**चंद्रावळः**—आणि तेवढ्यांत इकडे मोगलांचें धरणें आलें, तर राजांचें रक्षण कुणीं करावें ?

**शाहीरः**—दैवावर हवाला ! दुसरें कोण करणार ?

**चंद्रावळः**—नकोरे देवा ! दैवावरच हवाला टाकायचा, तर तो इथें राहूनच टाकूं ! आपला भोळाभाव देवाचरणीं रुजू असला तर गडावरून कुमक येईलच ! पण दुर्दैवानें तसें नाहींच घडलें तर—

**शाहीरः**—तर काय ? बोलतांना अशी थांबलीस कां चंद्रावळ ?

**चंद्रावळः**—शाहीरा ! तुला तुझ्या वचनाचा विसर पडला असेल, पण तुझ्या वचनांतलीं पंचाक्षरें पंचप्राणांत सांठविलीं आहेत बरें चंद्रावळीनें !

**शाहीरः**—कोणतीं तीं अक्षरें ?

**चंद्रावळः**—सहगमन ! सहगमनाचेंच व्रत सांगतों म्हणाला होतास ना ? मग रायगडाच्या कुमके आधीं दुर्दैवानें मोगलांचेंच धरणें आलें तर राजांच्या जिवापायीं आपण आपल्या जिवांची खैरात करूं, आणि हातांत हात घालून जोडीनें देवाघरीं पावते होऊं !

**शाहीरः**—ठीक आहे. जशी तुझी मर्जी ! तुझ्याच मनोदेवतेला मान देऊं. न जाणों सहगमनाला प्रवृत्त झालेली तूं देवता आहेस, विधात्यानें तुझ्याच वाणींत कांहीं भवितव्य सांठविलें नसेल कशावरून ? पण चंद्रा, अशानें माझ्या जिवाची तळमळ कशी—कशी शांत होणार ?

**चंद्रावळः**—माझ्या शाहीरासाठीं तोंवर मी एखादा गोडसा पोवाडा म्हणूं का ?

**शाहीरः**—पण जिवाची अशी तळमळ होत असतां गाणेंतरी कुठलें गोड लागायला !

**चंद्रावळः**—अगदीं तूं केलेला, तुझ्या आवडीचा, थोरल्या महाराजांच्यापुढें तूं गायलेला 'भगवाझेंडा' म्हणतें. म्हणजे तेवढाच मनाला विरंगुळा होईल.

# पोवाडा.

'भगवाझेंडा' फडकत आला, हरहरमहादेव बोला ।
हरहर महादेव बोला ॥ ध्रु० ॥
सुरेल सनया, शिंगें, कर्णे, पंचम स्वर धरिला ।
डंका, नौबदी, झडुनि राहिल्या, नादब्रह्म नभिं भरला ॥ १ ॥
मावळमेळा सभोंवार घनदाट खडा झाला ।
खास रिसाला शोभुनि गेला, हातांत झेलुनि भाला ॥ २ ॥
लगि बोथाटी, गोफणगुंडा लेजिम खळखळला ।
भालाबरची, कमान, तिरची, शिलेदार कुमकेला ॥ ३ ॥
आजुबाजूंवर स्वार दौडती, सांड बैठकीला ।
जरिपटक्याची बिनी अघाडिस, हत्ती खासा झुलला ॥ ४ ॥
थय्‌थय् वारू नाच नाचती, जीन साज चढला ।
टपटप टापा उडुनि राहिल्या, लगाम खेचुनी धरिला ॥ ५ ॥
मर्द गड्यांचें रक्त अर्पुनी, झेंडा बनवीला ।
शिरावांचुनी धड लढवोनी, मुरारबाजी पडला ॥ ६ ॥
या झेंड्या तव जननासाठीं तानाजी लढला ।
खुल्या हातावर वार झेलतां, वैकुंठासी गेला ॥ ७ ॥
छत्रपती श्रीशिवराया हा अवतारी झाला ।
समर्थ गुरुनीं प्रसाद दिधला, 'झेंडा भगवा' झाला ॥ ८ ॥

[ खाशाबा येतो.

**खाशाबाः**—अरेच्या ! हें काय लचांड जुळलं इकडे ! मधल्यामधें ह्या बोक्यानेंच साधलें वाटतें काम ? सर्ज्याच्या धास्तीनें हा रानदांडगा जवळ केला; पण ह्यानें तर आमच्याच तंगड्या आमच्या गळ्यांत घातल्या कीं ! छे, छे! छे ! ह्या बायका कुणाला कशा जवळ करतील कांहीं भरंवसा नाहीं ! मी कसाही फाटका असलों तरी ह्या रानदांडग्याच्या मानानें खात्रीनें मदनाचा पुतळा होतों ! पण शेवटीं वळचणीचें पाणी आढ्याला चढलें अं ! (उघड) का गोमाजीपंत, सुखाला लागलांत ना आतां ?

**कातकरीः**—व्हय्, व्हय् लई ग्वाड गमतया बघा!

**खाशाबाः**—आणि तुला ग? तुलाही गोड वाटत असेल? अगदीं शाहीरच भेटल्यागत झालं असेल नाहीं?

**चंद्रावळः**—खाशाबा कां उगीच छळतां असे आम्हांला?

**खाशाबाः**—छळतों? तो कसा? इतक्यांत यायला नको होतों वाटतं? कायरे दांडग्या, कशाला एवढी लगट केली होतीस तिच्याशीं?

**चंद्रावळः**—खाशाबा, कां उगाच गहजब करतां त्या देवमाणसांवर?

**खाशाबाः**—कां? कां? तुला कां पाझर फुटतो आहे एवढा? म्हणे देव-माणूस! दगडाचा देव झाला अं? आणि तुला ही देवता वाटत असेल?

**कातकरीः**—व्हय्! अक्षि नामी हेरलसां बघा, आइच्यान सांगतूं शिपाई दादा, लई ग्वाड बायकू हाय बघा!

**खाशाबाः**—लगनि लावतोस का तिच्याशीं?

**कातकरीः**—हूं, देतासा लावून? पन वाजंत्री कुठं हायती? नाईंतर ह्ये बघा, आम्ही दोघे होतों दादला बायकू; आन् बसा तुम्ही बाजा करीत! अन् घेऊं या लगिन उरकून नि काय?

**खाशाबाः**—नाहीं; आम्हाला बाजाच करीत बसवलं हिनें तर शेवटीं तुझ्याच गळ्यांत पडावं लागणार हिला.

**चंद्रावळः**—अहाहा! देवा, तो सोन्याचा दिवस कधीं उगवेल?

**खाशाबाः**—पण आतां कशाला एवढी लगट केली होतीस?

**कातकरीः**—म्यां, अन् तुमास्नी पुसल्या विगर? न्हाई बा दादा.

**खाशाबाः**—(स्वगत) लेकानें खरंच घोंटाळा केलेला दिसत नाहीं बरं का.

**कातकरीः**—हं, सांगशीला तर आतां पुसतु बघा, व्हतीस का या पठ्ठ्याची बाईल म्हुन! पन् कायहो, आधींच नाहींना पोरीचें लगीन लागल्येलं? न्हाईतर दुसऱ्यांनदां लगिन लागल बघा आमासंगें इचं! एकेका बाप्याला धा धा बायका खपत्याती! पन एकेका बायलंनं धा धा दादल केल्याल खपत न्हाईती! म्हुन पुसतों!

**खाशाबाः**—अरे चट सारें खपतें!

**कातकरीः**—छे, छे! त्ये लई वंगाळ बघा. लगीन लागलेली लक्ष्मी बघितली, कीं बाप्यानं कसं रामावानी राह्यला होवं!

**खाशाबा**:—अरे जा: असे सारेच राम राहते तर रामायणच झालें नसतं.

**कातकरी**:—इ, त्ये मातुर आपनाम्नी खपायचं नाही अं शिपाईदादा. दुसऱ्याच्या बाइलीकडे कोन वगाळवानी बघल तर त्येचा मुडदाच गाडणारा मरद हाय बगा.

**खाशाबा**:- म्हणजे आमचाही असाच समारंभ उडवणार वाटतं?

**कातकरी**:—वाईच इचार करा शिपाईदादा; तुमी चाकरीपाई अशी मुलुकगिरी करतायसा, अन् तिकडं गांवाकडं तुमच्या घरधनिनीकडं कोन वगाळवानी बघल तर त्ये तुमाम्नी खपल का?

**खाशाबा**:—(स्वगत) अरेच्या, हा लेक तर माझ्यावरच घसरत चाललाहे की!

**कातकरी**: व्हय शिपाईदादा? तुमच्या घरधनिनीकडं कोन वंगाळ-वानी बघल—-

**खाशाबा**:- -अरे समजलों, समजलों! घोळून घोळून कशाला सांगतोस!

**कातकरी**: -तस या वयेच जर आधीच लगिन लागून गेलं असलं तर तुमची हा मा-मन झाली की नाही? इकता मस्नी जाव द्या.

**खाशाबा**: --छत्, मुळी लगिनच झालं नाही इच. आणि म्हणून तर मनधरणी चालवली आहे इची मी. पण तो सर्जा लेकाचा मला नडतोयरे जिथे तिथें. पावलं वाजताहेत! नांव काढायची खोटी, हजर! मग काय शंभर वर्षं जगणार की काय हा! [ **सर्जाबा** येतो.

**सर्जाबा**:—मग काय मरूं म्हणतोस बेट्या?

**खाशाबा**:—ह. खुशाल मर! तुझ्या सवगड्यांना आतां कशान सुख होणार असेल तर ते तुझ्या मरणानेच. निदान मला तर इतका हर्ष होईल, की पहिल्या पोराच्या वेळीं राजेरजवाडे हत्तीवरून साखरा वांटीत सुटतात; तसा मी गाढवावरून गुळाची खैरात करीत सुटेन! मरायला मात्र नाहिजेस तू!

**सर्जाबा**: —अहो.मीच नाही.आपण दोघेही मरायची पाळी आली आतां!

**खाशाबा**:-- म्हणजे?

**सर्जाबा**:---कब्जाने आपला सगळा फाजीलपणा आडून ऐकला!

**खाशाबा**:—कशावरून?



कातकरी:—तसं कशापाई ! चला की राव समद् संभुराजाझोरं फितुरीची फिर्याद गुदरूं या !

**सर्जाबा**:—शंभुराजांना गिरफदार करायला आजच मोगल फौजा येणार आहेत; ही खबर द्यायला इतक्यांत शिर्क्यांचा सांडणीस्वार आला. कब्जी इकडे ह्या पागेकडे आहे असें सांगून त्याला वाड्यांतून इकडे आणतोय तो कब्जी आपला भिंतीला कान देऊन उभा !

**खाशाबा**:—अरे राम, मेलों ! आतां मात्र सर्जाबा चील मेलों ! आतां काय बरें इलाज करावा ? मी तर नाही नाही ते बडबडलों इथें !

**सर्जाबा**:—लेका, रंगबाजीची नीटशी दकलगिरी नव्हती तर आपले नाक कांपून निदान मला अपशकुन करावयाचा नव्हतास ? आतां नाही तुला, नाही मला, घाल त्या कुत्र्याला अशी आपल्या रंगबाजीची अवस्था तर झालीच: शिवाय फुकटांत मरायची पाळी आली की नाही ?

**खाशाबा**:—आतां काय बरें करावें ?

**सर्जाबा**:—काय करायचें ते लवकर ठरवा. एकीकडून मुकर्रबखान आणि एकीकडून मासाहेबांचा मेणा मागायला रायगडच्या रोखानें गेलेला शिर्का, दोघेही इथें माध्यान्हीच्या अमलांत दाखल होणार आहेत.

**कातकरी**:—काय राज येड्यागत विचकतायसा. अहो राव, दोघेबी त्येच्या कारस्थानांत हायसा; तर तेची शेंडी हाय की तुमच्या हातांत !

**खाशाबा**:—त्यालारे काय शेंडीचें ? वख्त आला की. झटकन शेंडी भादरून हा मोगल मिया बनेल ! मग काय त्याच्या शेंडीचें रंगावन करून तर नाहीना घालायच डोक्यात ?

**कातकरी**:—तसं कशापाई ! चला की राव समदे संभुराजा होर फितुरीची फियाँद गुदरू या. चंद्रावळवी हाय साक्षीला. कब्जीन चोरून हत आणलेल्या चंद्रावळीला राजानी हत बघितली, की कब्जी झालाच लंबा म्हन समजा.

**खाशाबा**:—नीघ लेका ! आम्हाला शहाणपण शिकवितो आहे. राजांजवळ हत्यारान्यारा न्यायच नाही. कब्जीबरोबरच आमचीही खांडोळी उडायची !

**सर्जाबा**:—शिवाय, राजांची भेट कशी होणार ? मुंगी फिरकायची नाहीं अशी पहाऱ्याची बंदोबस्ती राखली आहे कब्जीनें !

**चंद्रावळ**:—हें पहा सर्जाबा, मी सुचविते याला दुसरी तोड.

**खाशाबाः**—काय, काय सुचवितेस ?

**चंद्रावळः**—तुम्हांला तुमचे जिवाचा तसाच मलाही माझ्या जिवाचा घोर आहे. उद्यां तो चांडाळ कब्जी मला मोगलांकडे नेऊं लागला, तर माझ्या जिवाचें मी कांहीं बरें वाईट करून घ्यायला कध्धीं कध्धीं चुकायची नाहीं ! म्हणून म्हणतें शंभुराजासमोर जायला तुम्ही राजी नसाल तर निदान रायगडाकडे तरी रात्रीं चोरून पळूं या. तुम्हीच माझ्यावरचे पाहारेकरी तेव्हां सहज हा बेत पार पडेल.

**खाशाबाः**—हां जी हां ! नामी शक्कल निघाली कीं ! सर्जाबा, काय नमुन्याची अक्कल आहे ?

**सर्जाबाः**—नामी, नामी, छान, हीच मसलत पार पाडायची खाशाबा! ह्या हिकमतीनें आपल्याच हातीं ही रहाते ही त्याच्यांत और गम्मत आहे!

**खाशाबाः**—सर्जाबा, आतां मात्र कळस कळस केलास ! मरणानें मरतोयस्, तरी रंगबाजीचा आडाखा बघतोयस् अं ? बस्स ! खरा रंगबाज आहेस बाबा !

**चंद्रावळः**—मग कसं खाशाबा ?

**खाशाबाः**—कसें काय, लागतोंच आम्ही तयारीला !

**चंद्रावळः**—जा तर मग; सर्जाबा, राजांना धरण्यासाठीं मोगलांचा हल्ला किती प्रहर रात्रीला येणार ही खबर घेऊन या जा.

**सर्जाबाः**—हो, हो, निघालोंच ! चला कीं खाशाबा देवडीवर.

**खाशाबाः**—हो, एकटा मागें राहलों तर जीव तळमळेल नाहीं कां तुझा ? चल बाबा !

**चंद्रावळः**—जवळ दहा पांच कोसांत लपायला निवांत अशी जागा बघायला कातकऱ्याला धाडतें बरं का ! [ **सर्जाबा** व **खाशाबा** जातात.] चला शाहीर, आतां लगबग करा, मघाशीं म्हणालांत तसा गांवांतून घोडा पैदा करून आधीं रायगडची वाट धरा. मासाहेबांचा मेणा जवळ आला असेल तर मराठ्यांच्या थोड्याफार तरी नेकीच्या तरवारी असतील मेण्याबरोबर ! जा, आता वेळ दवडूं नका.

**शाहीरः**—ठीक आहे. हा निघालोंच. [ जातो.

---

# प्रवेश तिसरा

[ **स्थळ**—सह्याद्रींतील भयाण जंगल. पात्रें—**संतूमाई** गाडींत बसली आहे बरोबर **दौलती** नांवाचा नोकर.]

**माई**:—दौलती ! कुठली काढलीस बाबा ही आडवाट ? जिवांत जीव नाहींसा होऊन गेला आहे ! अरे, तिनसांजा झाल्याना ? गड सोडून आज तीन दिवस झाले; बैलाना पडत्या पावलांची खात्री आल्याविना पाऊल उचलवत नाहीं; जरा विसांवा करावा तर आलों कुठें समजेना; जायचें कुठें उमजेना; कसें गुदमरल्यागत झालें आहे. एखाद्या ओसाड तळघरांत खोल कुठें तरी दिवा मिणमिणत असावा तशी जिवाची गत झाली आहे बघ !

**दौलती**:—काय करतां माई ! कलुषानें शंभुराजांना कुठें बेपत्ता केल्याची वदंता फैलावल्यानें मोगली हेरांनीं हा मुलूख कसा घेरल्यागत केला आहे ! मग नको का ही बिकट वाट तुडवायला ? अशा बावऱ्या होऊं नका ! इतकें आल्यासारखें आणखी कळ काढा ! आजची रात्र उलटली, कीं उद्यां आपलें राज्य आहे !

**माई**:—आजची रात्र ! दौलती, उलटेलना आजची रात्र ? उगवेलना उद्यांचा दिवस ?

**दौलती**:—माय माझे ! असें धीर खचल्यागत काय करावें बरें ? असें काय नाकाशीं सूत धरलें आहे आपल्या ?

**माई**:—काय सांगूं दौलती ! माझ्या मनाची मी परोपरीनें समजूत काढतें आहें. पण कां कुणास कळे माझ्या आयुष्यांतील ही शेवटची तिनीसांज आहेसें मला वाटतें. आजूबाजूच्या ह्या खोल खोल दऱ्या; काळपुरुषासारखे हे काळेकुट्ट उंच उंच कडे, किर्रकिड्यांनीं आक्रोश करणारी ही भयाण राई; मुली, आतां कुठलें तुला सासर अन् माहेर असें म्हणत आहेतसें वाटतें !

**दौलती**:—चूप बेटा, असे वेडेविद्रे कुतर्क रचूं नयेत. खंडूजींनीं भरंवशाची सोबत म्हणून ह्या बुढ्याला संगतीला धाडला, तो मी ही थोरा-घरची जोखीम कशी बरें हरपूं देईन ? माईसाहेब, मोठ्यांच्या लेकीसुना तुम्ही ! भारी भारी म्हणजे तुळशीकट्टयावर लपंडावाचा खेळ मांडून,

अंगणांतून परसांत, आणि परसांतून अंगणांत, दुडदुड धांवलेल्या! तुम्हाला ही मुशाफरीची दगदग कुठली निभायला? चला, ती बघा, त्या बावडीवर मोट चालू आहे; तिथें डोळ्यांना पाणी लावा म्हणजे बरें वाटेल बरं बाबा!

**माई**:—बरं आहे. तुमची मर्जी.

**दौलती**:—अहो पाटील, पाटील, पाटील.

**शेतकरी**:—होऽऽऽ! अर कोन हरल्या मारतुया त्यो? अलों आलोंहो नाईकसाब.　　[ **शेतकरी** येतो.

**दौलती**:—रामराम पाटील.

**शेतकरी**:—कसल राज पाटील, इळभर उरीं फुटावं तवा कुठं वाइच आंतड्याला आधार व्हतुया तुकड्याचा! त्यांतन हे दिस असं खोटं आल्याती! दोन कर्चांबर्चांबी हायती. खातुया थंडीवाऱ्यासंग खस्ता! तुम्हां लष्करच्या शिपाईगड्यावानी आमचं थोडंच रहातया? बरें, कुन्या गांवापून येनं केलं? जातयसा कुन्या मुलखीं? अरे भगवाना! गाडीमंदी बाया बापड्याबी दिसल्याती किंहो!

**दौलती**:—होय बाबा, माझी मुलगी आहे. तिला सासरीं येतों गुदरून झालें!

**शेतकरी**:—आतां काय करावं ह्या भोगाला! ह्या खोट्या येळेला जंगलांत कसा आनलासा जी तरनाताठा जीव?

**दौलती**:—कां बर? कांहीं दगाफटका आहे कीं काय ह्या रानांत?

**शेतकरी**:—काय राज! येड बिड तर नाहीं लागलं तुम्हास्नी?

**माई**:—म्हणतोस तरी काय बाबा?

**शेतकरी**:—अवो राव, त्या मुसंड्यांची गांठ होईल तर पोरीला आपल्या हातानं इख द्यायचा वखुत येईल न्हवं?

**दौलती**:—मुसंडे! ह्या जंगलांत कुठले मुसंडे?

**शेतकरी**:—आपल शंभुराजे कुटं नाहींसे झाल्याती नव्ह? त्ये पायीं ह्ये मुसंडे रातबेरात सारखे घुमत्याती ह्या जंगलांतन! आतां तुम्हा म्होरंच गेल्याती नव्ह का?

**दौलती**:—ज्या दत्ताला भीत होतों तेंच शेवटीं पुढें आलें!

**माई**:—दौलती, माझी रुखरुखच अखेर खरी होणार कारे? ..

**शेतकरी**:—अय्योयो! बये, त्येच्यामंदी इतकं रडाया कशापाई होवं? आमीं रानचं राजे हाव नव्ह वंगाळ वक्ताला? आमीबी मराठ, तुमीबी मराठ. जातीनं जात वोळखाय व्होवी. आज तुम्हांवर त्योच उद्यां आम्हांवर वखुत येणार ना! मंग देवघेवीबिगर निभतया व्हय?

**माई**:—खरं बोललास बाबा!

**शेतकरी**:—मग व्हा तर गाडीखालीं. आन् चला त्या खोपटाकडं बिगीबिगी! घोट घोट अंबील ढोसून, करूंया गुजरान् रातोरात! मग उद्यांची बात उद्यां! हं उतरा.

**माई**:—उतरतें बरें बाबा! कसा देवासारखा आलास. [ दूरवर घोडेस्वार येतांना दिसतो.] अगबाई! दौलती, झाला, घात झाला!

**दौलती**:—म्हणजे झालं तरी काय?

**माई**:—तो पहा! तो पहा! समोरून कोणी घोडेस्वार दौडत येत आहे. आला, आला; अगदीं इकडेच आला! पण हा कोणी भिल्ल दिसतो आहे. नाहीं, नाहीं; तुळशीराम शाहीर आपला हा! होय, तोच तो! शाहीर, शाहीर, अहो तुळशीराम शाहीर!

**शाहीर**:—( आंतून ) इथें कोण शाहीर म्हणून पुकारतें आहे मला?

**माई**:—शाहीर, शाहीर! मी खंडोबल्लाळांची बहीण माई साद घालतें हो तुम्हाला.

**शाहीर**:—खंडूजीची बहीण? अशा रानावनांत! [ प्रवेश करून ] माई, हा काय घोटाळा आहे?

**माई**:—मी रानगांवीं निघालें आहे.

**शाहीर**:—आणि सोबत?

**दौलती**:—मी, मी दौलती आलों आहें.

**शाहीर**:—कोण दौलती? वाहवा! किती मोक्यावर भेट झाली तुझी! असाच अखेरपर्यंत नशिबानें हात दिला तर हां हां म्हणतां राजांची सुटका करूं. पण दौलती, मालवतांना ज्योत मोठी व्हावी, मरणाआधीं दुखणे-कऱ्याला हुशारी यावी, तशागत ह्या गोष्टी जुळत नसतील ना?

**दौलती**:—म्हणजे? बडबडतोस तरी काय? राजे खुशाल आहेत ना?

**शाहीरः**—राजे! आणि खुशाल! हो, मी निघेपर्यंत खुशालच होते म्हणायचे.

**दौलतीः**—आणि पुढें ?

**शाहीरः**—भगवंताला ठाऊक !

**दौलतीः**—आणि त्यांना संकटांत सोडून तूं इकडे दौडतो आहेस !

**शाहीरः**—मग मी एकटा तरी काय काय करूं ? कुठें कुठें पुरा पडूं ? तिकडे शंभुराजांवर मुकर्रबखान घाला घालायला येतो आहे, म्हणून राजांवर जीव लावूं, कीं इकडे मासाहेबांचा मेणा मारायला हजार पांचशें अरबांचा रिसाला घेऊन गणोजी येत आहे ही वर्दी खंडोबाला देऊं ?

**दौलतीः**—मला अधिकच बुचकळ्यांत पाडतो आहेस तूं. रायगड सोडून मासाहेब इकडे कशा ?

**शाहीरः**—पतिदेवांची पुन्हां रायगडच्या देव्हाऱ्यांत स्थापना करावी म्हणून ह्या आडमार्गानें त्या संगमेश्वरीं निघाल्या आहेत. आतां वेळ दवडून निभाव नाहीं. आधीं खंडोबांना सावध केलें पाहिजे. येतों मी.

**दौलतीः**—वेडा आहेस. राजांच्या जिवाची जपणूक झाली पाहिजे. आटप, रिकिबीला पाय लाव आणि परत संगमेश्वर गांठ !

**शाहीरः**—पण मासाहेबांचा मेणा जवळ आला असेल. तिकडे हल्ल्याची खबर कुणीं द्यावी खंडोजीना ?

**दौलतीः**—मी जिवंत आहेंना ?

**शाहीरः**—मग माईची वाट काय ?

**दौलतीः**—देवावर हवाला ! आटप घोड्यावर मांड ठेव [ **शाहीर** जातो.] अनोळखी जवाना, जिगर जातीचा मराठा गडी आहेस; तुझ्या या कंगालाच्या झोपडींत अठराविश्वे दारिद्य नांदत असलें तरी मनाचा बादशहा आहेस. तुला लेंकरेंबाळें असतील तर तूंच या लेकराच्या ताटा-तुटीचें दुःख जाणशील. ही रायगडच्या खंडोबल्लाळाची बहीण आहे. प्रसंगानें मी तुझ्या हवालीं करून निघालों आहें, तिचें नीट जतन कर बरें !

[ **खंडूजी येतो.**

**खंडूजी**:—दौलती, हा तिचा भाऊ तिचें जतन करायला हजर आहे.

**माई**:—कोण! माझा भाऊराया? माझा खंडोबा! अहाहा!

[ खंडूजीला मिठी मारते.

**खंडूजी**:—दौलती, अनोळखी माणसाच्या हवालीं हिला करून निघाला आहेस असें संकट तरी कसलें ओढवलें आहे?

**दौलती**:—धनीसाहेब, संकट फार भयंकर आहे! मासाहेबांचा मेणा मारायला हजार पांचशें अरबांचा रिसाला घेऊन गणोजी शिर्का आपणांवर चाल करून येत आहे. आणि तिकडे शंभुराजांवर मुकर्रबखान चाल करून राहिला आहे.

**खंडूजी**:—कशावरून?

**दौलती**:—इतक्यांत इथें शाहीर येऊन गेला, त्यानें ही वर्दी दिली.

**खंडूजी**:—अरे, अरे, अरे! आतां मात्र दुर्दैवाची अखेर—अखेर झाली! परमेश्वरा, परमेश्वरा! मराठ्यांचे भाळीं भवितव्य तरी काय खरडलें आहेस? शंभुराजांच्या सोडवणुकीचा निर्वाणीचा इलाज म्हणून ह्या साध्वीला गुप्तपणानें अशी वनवासी केली! राजांना घेतल्याविना रायगडाची पायरी चढणार नाहीं अशी राजारामराजांना कळकळीनें खात्री दिली; पण एका घरभेद्याच्या कसाबकरणीनें सारी सारी जिवाची आटापीट वायां गेली! आतां ह्या मूठभर मावळ्यांच्या बळावर मी करूं तरी काय? ही दख्खनची पुण्याई—मासाहेब—सांभाळूं कीं तिकडे तो सिंहाचा छावा—शंभुराजा—फशीं पडतो आहे तिकडे धांव घेऊं?

**माई**:—भाऊ, तुझ्या आधींच्या राजांनीं मूठभर मावळ्यांच्या बळावरच एका राज्याची उभारणी केली ना?

**खंडूजी**:—माई, तशी ती आभाळाला गवसणी घालणारा तो महापुरुष होता!

**माई**:—आणि तूं असा ढसढसां आंसवें ढाळणारा भाग्यबाई आहेस असेंचना? मग दिमाखानें नांवापुढे बाळाजी आवजीचें नांव तरी कशाला लावतोस? भाऊ, मूळ बुंधा तुटून गेला तरी नुसत्या पारंब्यांनीं वटवृक्षाची छाया राखावी. कधीं काळीं होऊन गेलेल्या रामलक्ष्मणांच्या

पुण्याईची, क्षेत्ररूपानें दगडाधोंड्यांनीं आठवण जागवावी आणि तुम्हीं चालत्या बोलत्या माणसांनीं गेल्या पिढीच्या शिपाईब्राण्याची सांडण करावी ?

**खंडूजी**:—माई, गैरसमजुतीनें कां उगीच माझी अशी हेटाळणी मांडली आहेस ? माझ्या पोरवयापासून माझें लालनपालन करून ज्या माऊलीनें आपली काया शिणविली, तिच्या चरणांवरून माझ्या कायेची कुरवंडी करायला मी केव्हांही कचरणार नाहीं ! पण जीव देऊनही आतां ह्या राजसरूपांची सुटका होईलसें दिसत नाहीं; म्हणून माझ्या काळजाचें पाणी पाणी होत आहे ! ठीक आहे ! दुर्दैवा, ये, पाषाणाच्या निष्ठुरतेनें चालून ये. जिवांत जीव असेतों तुझ्याशीं टकरा खेळायला हा खंडूजी तयार आहे ! पूर्वजन्मींच्या पातकांनों, तुम्हीही याच घडीला आडवीं पडा ! तुम्हां सगळ्यांशीं झुंजायला हा खंडूजी तयार आहे ! माई, अशी माझ्यासमोर ये, आणि विचारतों त्या सवालाचा जाब दे. पुरंदरच्या घनचक्कर वेढ्यांत झुंज हातघाईवर आली असतां एका पठाणानें घोडा अकस्मात् अंगावर घालून मुरारबाजीची गर्दन उतरली ! माई, मस्तक धडापासून तुटून पडलें तरी बहाद्दराच्या नुसत्या धडानें दहावीस लढवय्यांचे मुडदे पाडले ! त्या मुरारबाजीच्या जातींत तुझा जन्म झाला आहे. विशाळगडच्या वाटेवर आठ हजार मोगलांनीं रातोरात चंद्रजोती पाजळून आबासाहेबांचा पाठलाग मांडला असतां, धन्याच्या जिवासाठीं नुसत्या पांचशें मावळ्यांच्या बळावर बाजीप्रभूंनीं खिंड रोखून धरली ! अंगावर पैशा पैशा एवढ्या जागेच्या अंतरानें शत्रूचे घाव बसले ! रक्तानें वीर नखशिखांत न्हाला; पण राजांच्या खुशालीची खूण पटल्याविना कंठांतून प्राण सोडला नाहीं ! त्या कायस्थाच्या जातींत तूं निपजली आहेस ! बोल, तुझ्या राणीच्या जिवासाठीं तूं स्वतःच्या जिवावर पाणी सोडून मेण्यांत बसायला राजी आहेस का ?

**माई**:—अरेरे ! वेड्या, नसती शंका काढून माईच्या जिव्हारीं घाव घातलास ! मी बाईमाणूस आहें; अशी का तुला शंका पडली ? अरे, मी बाईबापडी असलें म्हणून कांहीं अमृताचे घोट गिळून अजरामर झालें नाहीं. आज ना उद्यां साऱ्यांनाच देवाच्या दरबारीं रुजू व्हायचें आहे. मग ही लाखांची मीठभाकरी पोटांत असतां तिला तारायची पर्वणी मी कशी वायां जाऊं देईन. भाऊ, तुझ्या वाडवडिलांची कर्तबगारी माझ्या

घराण्यांत पिढीपिढीनें चालत आलेली नसली तरी मी तुझी बहीण आहें ! सख्खी नसलें तरी विधात्यानें ज्या माऊलीच्या कुशींत तुझा पिंड घातला तिच्याच सख्ख्या बहिणीच्या कुशींत माझा पिंड घडला ! मग तूं असा राजीखुशीनें खाईंत उडी घालायला निघाल्यावर माईच्या जिवाचा कोण केवा ? भाऊ, सांगशील तर तुझ्या बोटांतील ती हिरकणी मी कडाडा फोडून खाईन बरं !

**खंडूजी**:—अहाहा ! घे, घे तर ही हिरकणी. माई ! विश्वंभरानें राजहंसाला तारण्यासाठीं मोत्यांचा चारा सांगितला, पण हा तुझा दुर्भागी भाऊ तुला मारण्यासाठीं हिरकणीचा चारा देतो आहे. माई, ही हिरकणी दांताखालीं धरतांना तुझी सुकुमार काया काळवंडून जाईल. संसारसुखाची नुकती कुठें गोडी लागलेल्या तुझ्या जिवाला अनंत यातना सोसाव्या लागतील ! पण लक्षचौऱ्यायशींच्या फेऱ्यांतून निरंतरची मुक्तता होईल ! विश्वंभराच्या पायाशीं पावती होशील ! घे ही हिरकणी !

[ हिरकणी देतो. **येसूबाई** व **नाईक** येतात.

**येसूबाई**:—खंडूजी, कशाकरतां ती हिरकणी दिलीस माईला ? ऊर कां भरून आले आहेत तुमचे ? असे केंविलवाणें कां पाहतां एकमेकांकडे ? खंडोबा ! माई !

**माई**:—कांहीं नाहीं मासाहेब; भाऊजवळ लडिवाळपणानें मीं हिरकणीचा हट्ट केला.

**येसूबाई**:—छ,छ, छ, छे ! जीव गुदमरून चालले आहेत पोरांचे ! जगदंबे, ह्या लेंकरांच्या मनांत तूं प्रेरणा तरी कसली केलीस ?

**खंडूजी**:—माईनें सांगितलेंना मासाहेब ! काळिकाळालाही लाज वाटावी अशीच माईच्या मनीं प्रेरणा केली आहे जगदंबेनें ! एरव्हीं माझ्या माईला हिरकणीची काय गरज ? जीव का द्यायचा आहे ती कडकडा चावून ?

**येसूबाई**:—द्याल बाबांनों ! अरे, ह्या दोन दिवसांच्या दुनियेंत शापभ्रष्ट होऊन आलेले स्वर्गीचे देव तुम्ही ! कुणीं भरंवसा द्यावा तुम्हां देवमाणसांचा ?

**खंडूजी**:—मासाहेब, कशी खातरजमा करावी आपली ? खंडूजी कधीं खोटं बोलला आहे का आपल्यापाशीं ?

**येसूबाई**:—मग गुलामा, आजच कां असा खोटेपणा मांडलास ? ही सोन्यासारखी पोर हटवादीपणा करील का ? हिला हिरकणीच हवी असती, तर वाण का होती आपल्या भांडारांत नवरत्नांची ? हिला मढवून नसती का काढली हिऱ्यामोत्यांनी ? मग इवल्याशा हिरकणीसाठीं तुम्हांला डोळ्यांतून टिपें गाळायची काय बर गरज ? छे, छे, छे ! खंडूजी, तूं कांहीं म्हण; खरें बोल, खोटें बोल: माझें मन मला ग्वाही देत आहे, कीं पोरीच्या जिवाचें कांहींतरी वरवाईट करायचें तुझ्या मनांत आहे. आणि मला चोरून तूं असा मांग बनला आहेस, तेव्हां माझ्याच तारणासाठी—

[ **टेहळ्या** येतो.

**टेहळ्या**:—संभाळा, चिटणीस संभाळा, मासाहेबांचा बचाव करा ! शत्रूचा घाला अगदीं जवळ येत चालला. गणोजी अघाडीवरच दौडतो आहे. आधीं मासाहेबांचा बचाव करा. [ जातो.

**खंडूजी**:—अरेरे ! अखेर ह्या टेहळ्यानें इथें अवचित येऊन घात केला.

**येसूबाई**:—काय ऐकते मी हे ? शत्रूचा घाला जवळ आला ? आणि माझ्या नाशाकरितां माझा भाऊ गणोजी अघाडी साधून दौडतो आहे ! अहाहा ! आतां अगदीं लख्ख प्रकाश पडला. आणि कठोरा, एवढ्यासाठींच ह्या पोरीला तूं हिरकणी दिलीस की नाहीं बोल ? उघड वाचा !

**खंडूजी**:—होय मासाहेब !

**येसूबाई**:— अरेरे ! निर्दयांनो ! तुम्ही भाऊ नव्हत ! वैरी आहांत साता जन्माचे ! काय, ह्या कोंवळ्या जिवाची कतल करून मी आपला जीव जगवूं ? नाहीं ! नाहीं ! खंडोबा, साजऱ्या सुवासिनीला मरण दिल्यानें माझ्या कुंकवाला कधींही बळकटी यायची नाहीं ! [ मूर्च्छित पडतात.

**खंडूजी**:—अरे, हें काय ? मासाहेब ! मासाहेब ! देवा, अशा आणीबाणीच्या वेळीं हें काय अरिष्ट आलें ? मासाहेब ! माई, काळवेळ म्हणतात ती हीच नसेलना ? आणखी एखादे वेळीं ह्या माउलीला अशी घेरी आली असती तर उभ्या राजवटीचा प्राण कासावीस झाला असता, पण आज—नाहीं बघवत आतां माझ्यानें ! दौलती, आटप ! ही महाराष्ट्राची लाज—बेशुद्ध आहे तोंच घोड्यावर घाल आणि दहावीस मावळ्यांच्या सोबतीनें



खंडूजी:—अरे, हें काय ! मासाहेब ! देवा, अशा आणीबाणीच्या वेळीं हें काय अरिष्ट आलें !

[ अंक २ रा–प्रवेश २ रा–पृष्ठ ८६.

आड जंगलांतून रायगडाचें अंतर काप! हा शेतकरी तुला वाटाड्या होईल. मासाहेब शुद्धीवर आल्या कीं त्यांना ह्या खंडूजीचा मुजरा सांग आणि म्हणावें राजांचा घोर घेऊं नका. लौकरच त्यांना रायगडीं सुखरूप पावतें करतों. वाटेनें जपून जा. प्रसंग गुदरला तर गाद्या रुजाम्यावरच्या या कोमल चरणाना कडेकपाऱ्या तुडवायला सांग! उपातापाशी ने! पण ही थोराघरची दौलत थोराघरीं पावती कर! [**दौलती** व **शेतकरी येसूबाई**ला उचलून घेऊन जातात.] माई, हीच आतां आपली शेवटची भेट! ह्या तुझ्या भावाला एकदां डोळे भरून पाहून घे. कधीं कांही उणें अधिक बोललों चाललों असेन तें विसरून जा आणि मासाहेबांचे जागीं जाऊन बैस. [दीन, दीन! असा शब्द होतो.] शत्रू छातीवर आला!

**माई**:—भाऊ, येतें बरं! [नमस्कार करते.

**खंडूजी**:—ये बरं माई! कुळींचा कुळस्वामी तुझा निर्धार अखंड राखील! माई, हिरकणी चावतांना कुळस्वामिनीला नमस्कार कर. आपल्या पतीला नमस्कार कर. वाडवडलांना नमस्कार कर. कसलीही आशा ठेवूं नकोस. सुखानें स्वर्गारोहण कर! [**संतुमाई** जाते. आंत पुन्हां दीन, दीन, असा शब्द होतो.] बस्स! आतां खुशाल दीन दीन गर्जवा! हें पहा नाईक, मी आतां संगमेश्वरीं राजांच्या सलामतीला दौडतों. माझ्या माईनें हिरकणी चावली कीं—[कानांत सांगतो. पडद्यांत—दीन, दीन!] हा शत्रू आलाच! मी येतों. राम राम! [जातो. पडद्यांत—दीन, दीन!

**नाईक**:—अरे मर्दांनों बघत काय बसलायसा? चला बेगी बेगी मेणा घेऊन!

[भोई मेणा घेऊन जाऊं लागतात. इतक्यांत **गणोजी** व **अरब** येनात.]

**गणोजी**:—खबरदार मेणा हलवाल तर!

**नाईक**:—अर जार; तुझ्यावानी शिराताननार लई बघितल्यात!

**गणोजी**:—चूप! जीभ आटप. नाईक, तूं कोणासमोर उभा आहेस?

**नाईक**—कोन म्या व्हय? हाय, हाय, ठाव हाय! परमुलुखाचं शिपाई गडी घेऊन सख्या भइनीवर घाला घालणाऱ्या योका कसाबा म्होर उभा हाय! चालवा रे चालवा म्येना! काय त्या शेंदाड शिपायास्नी बिचकतायसा.

**गणोजीः**—खबरदार ! नाईक, सख्ख्या बहिणीवर घाला घालण्याइतके आम्ही निष्ठुर बनलों आहों अशा बेअकली तर्कटानें तेरीमेरीवर याल तर नाहक मुडदे पडतील.

**नाईकः**—अर, पडलं मुडदं तर पडलं ! मेन्यांतल्या ह्या आईभैनीच्या पायपोसामारी जा.

**गणोजीः**—ठीक आहे नाईक. मासाहेबांना ताब्यांत घेतल्याशिवाय हा गणोजी रहात नाहीं ध्यानांत धर ! देखतेहो क्या अरब ? चलाव समशेर ! बहोत अच्छा. मेना समालो; मेना समालो. हो गया फत्ते ! [ नाईक वार लागून पडतो; कांहीं मावळे पळतात; कांहीं जखमी होतात. इतक्यांत पडद्यांतून—राजे, राजे; आपण इकडे लढण्यांत गुंतला आहांत तोंच कांहीं मावळ्यानिशीं खंडोजीनें संगमेश्वराकडे घोडा फेंकला ! धांवा, धांवा.] काय ? संभाजीच्या सुटकेला तो खंड्या धांवतो आहे का ? कुछ फिकीर नाहीं. ह्या गणोजीपुढें किती दौडेल तो. चलो रिसालदार, दौडा पीछोंपीछ. अबी संभाजीपर हमला ! चालवा मासाहेबांचा मेणा.

[ मेणा घेऊन जातात.

**नाईकः**—[ घायाळ स्थितींत ] जा लेका खुशींत गाजरें खात. तुझ्यासारख्या घरभेद्याच्या हातीं लागायला मासाहेबांनीं काय पापानं पाय धुतल्याती व्हय ? आमच्या गोजऱ्या संतुमाईनं मातोर जिवाचं सोनं-सोनं करून घ्येतलं ! [पडदा पडतो.

---

# प्रवेश चवथा

[ **स्थळ**—संगमेश्वर. पात्रें—**कलुषा.**]

**कलुषाः**—कोण भयाण रात्र ही ! काळोखानें दुनिया कशी गिळून टाकिली आहे ! ह्यातींत पातकापरतें कांहीं केलें नाहीं, अशा हाडांचा सांपळा उरलेल्या क्रिया-नष्ट दुखणेकऱ्याचें हास्यही इतकें भयाण नसेल ! रातकिड्यांची कर्कश किरकीर, भुताखेतांचे उतारेधुतारे पडलेल्या तिठ्या-

बरची मरतमढ्या कुतऱ्यांची रडारड, आणि मसणवट्यांत मढ्यांचीं हाडें चघळणाऱ्या भालूंची किळसवाणी हुकी ह्या अपशकुनांखेरीज कांहीं—कांहीं ऐकूं येत नाहीं! मांग जातीच्या महापातक्यानें सूर्याला ग्रासिल्यावर नाहींच नाहीं, पण दुनियाच घशांत घालणाऱ्या प्रलयकाळानंतरही अशी भयाण सुतकीकळा पसरत नसेल! ह्या अशा ऐन मध्यरात्रीच्या अमलांत भुतें, पिशाच्चें, हडळी, डाकिणी, अशा अघोरी वासनांखेरीज आणखी कोणी वावरत असेल का? मीही एक वावरतों आहें! अरे, दुसरें कोण बोललें तिकडे? झोंपेंत संभाजीच बरळतो आहे का हा? त्याच्या जिवा-भोंवतीं स्वप्नांनीं कसें काहूर मांडलें आहे! बिचाऱ्याला निवांत अशी झोंपच कशी ती आज—आजच नव्हे आतां हयातींत नाहीं! बाकी हयात तरी किती बाकी राहिली त्याची? इतक्यांत कृतांतासारखा तो मुकर्रबखान इथें दाखल झाला, कीं खलास मामला! बेट्या खंड्या, जिवाची कदर सोडून मारे जंग जंग पछाडीत आलास; म्हणून धन्याची ललाटरेषा का आतां तुला टाळतां येईल? गगनांत गिरक्या घेऊन जीव पाखडणाऱ्या ह्या ताऱ्यांचें, जसें दुणावत्या अंधारावर तेज नाहीं तीच तुझी दशा ठरली; इतकेंच नव्हे तर, उल्कापाताप्रमाणें तुझाही सत्यानाश झाला नाहीं तर दैवाची खैरच समज! अरे, आतां तर पावलांचीही चाहूल येऊं लागली! मोगल आल्याचा इशारा द्यायलाच कोणी येत असेल का? नाहीं तर—

[ **तुळशी** येते.

**तुळशी**:—कब्जी! कब्जी!

**कलुषा**:—तुळशी!

**तुळशी**:—हो, तुळशीच मी. मोगलांचा अजूनही पत्ता नाहीं?

**कलुषा**:—छे! मागमूस नाहीं!

**तुळशी**:— छे, छे, छे! आपला तर बाई धीर खचला आतां.

**कलुषा**:—म्हणजे?

**तुळशी**:—अहो, भलभलतीं स्वप्नें पडूं लागलीं आहेत त्याला! कर-करां दांत ओंठ चावून, हाणा, मारा असें कांहींच्या बाहींच बरळतो आहे तो संभ्या!

**कलुषाः**—हळूच जाग आणून कैफानें आणखी जरा गाफील कर जा त्याला!

**तुळशीः**—माझाही तोच इरादा होता. पेला भरून पलंगाशींही गेलें होतें मी; पण तेवढ्यांत दण, दण, अशीं कोणाच्या तरी पावलांची चाहूल आली बघा!

**कलुषाः**—म्हणजे! सांगतेस तरी काय? एवढ्या नंग्या समशेरीच्या पहाऱ्यांतून येईल तरी कसें कोण दणदणा?

**तुळशीः**—काय ग बाई नवल तरी? अवसे पुनवेला माणसांचीं रूपें घरून भुतेंखेतें वावरतात म्हणे! त्याचा तर नसेल हा दाखला?

**कलुषाः**—आणखी कांहीं विपरीत घडलें नाहींना?

**तुळशीः**—अहो, अचंबा तर पुढेंच आहे! पावलांच्या चाहुलीनें चपावून कोनेकोपरे मी न्याहाळूं लागलें, तों "राजा, वैऱ्याची रात्र आहे; जागा रहा! राजा, वैऱ्याची रात्र आहे; जागा रहा!" असें खोल आवाजानें कोणी—[राजा, वैऱ्याची रात्र आहे; जागा रहा!] अगबाई, तोच आवाज पुन्हां. [राजा, वैऱ्याची रात्र आहे; जागा रहा!] पुन्हां तोच आवाज! [पडद्यांत—**संभाजीः**—कोण वैऱ्याची रात्र म्हणून पुकारतो आहे?] अरे देवा! संभाजीही जागा झाला वाटतें?

**कलुषाः**—चल, चल जलदी आंत.

[जातात. पडदा नाहींसा होतो; **संभाजी राजे** तरवार सरसावून चौफेर पहात आहेत असा देखावा.]

**संभाजीः**—खरोखरच ही वैऱ्याची रात्र आहे कां? घातापातापायीं आमच्या भोंवतीं कपटाची माया आंथरून खरेंच कोणीं काळसर्पानें डूक धरला असेल का? तीन तिनदां न्याहळून नजरेंत कोणीच कसें येत नाहीं? मग त्या भयंकर स्वप्नांतून जाग येतांच "राजा, वैऱ्याची रात्र आहे; जागा रहा! राजा, वैऱ्याची रात्र आहे जागा रहा!" अशा खोल आवाजानें आम्हाला अरळ्या कोणी दिल्या? ह्या नजरबंदीची सांगड तरी कशी घालावी मनीं? बोलवा आहे, कीं ह्या जुनाट वाड्याखालीं एक भुयार असून, भुतांखेतां-विषयीं त्याची ख्याति आहे! तेथून नाहींना कोणीं साद घातली? **संकटांत**

गवसलेल्या गाईच्या हंबरड्यागत ह्या अरळ्यांनीं, गडावर कब्जीच्या फितुरी-बद्दल राणीसाहेबांनीं गाऱ्हाणें केल्याची एकाएकीं आठवण—[राजा, वैऱ्याची रात्र आहे; जागा रहा! राजा, वैऱ्याची रात्र आहे; जागा रहा!] पुन्हां तीच हांक! फिरून तोच इषारा! कोण आहे पहाऱ्यावर, पहारेकरी? कब्जी! [कब्जी येतो.

**कलुषाः**—जी हुजूर!

**संभाजीः**—फिरून सामसूम! कब्जी! बंदोबस्तांत आज गाफिली झाली आहे का? शराबपाण्यानें पहारेकरी बेहोष बनले आहेत का?

**कलुषाः**—निखालस नाहीं. लाखाच्या पालनहाराभोंवतीं पाहरा जागवायचा तो बेनिगा कसा राहील हुजूर? रात्रींतून कितीदां तरी जातीनें मीच बंदोबस्तावर नजर टाकीत असतों. आतां ही तिकडूनच फेरी आली माझी.

**संभाजीः**—मग खोल आवाजानें कोणी कांहीं बोललेलें नाहीं ऐकलें तुम्हीं?

**कलुषाः**—हुजूरना भास झाला!

**संभाजीः**—भास? खात्री झाली आमची! आधीं आम्ही गाढ झोंपेंत असतांना, संतापानें नखशिखांत थरकांप झाला आहे अशी तीर्थरूप आबा-साहेबांची स्वारी—अहाहा! आठवणीसरशी शहारे आले अंगावर. आबा-साहेबांची स्वारी आमच्या स्वप्नीं आली आणि गहिंवरानें पोटाशीं धरून "लेंकरा, नकोरे नको ह्या घातपातांत गवसूं! संभ्या, जागा हो आणि राजवटीचा मार्ग धर." असें आम्हांला बजावलें. लगबग आम्ही खडबडून जागे झालों; तों खरोखरच खोल आवाजानें कोणीं "राजा, वैऱ्याची रात्र आहे; जागा रहा"! "राजा, वैऱ्याची रात्र आहे; जागा रहा!" असें—[राजा, वैऱ्याची रात्र आहे; जागा रहा!] हा पहा फिरून तोच आवाज! [राजा, वैऱ्याची रात्र आहे; जागा रहा.] फिरून तोच इषारा! [राजा, वैऱ्याची रात्र, आहे जागा रहा.]

**कलुषाः**—(स्वगत) अरे, चंद्रावळीचा आवाज हा! [राजा, वैऱ्याची रात्र आहे; जागा रहा!]

**संभाजीः**—हे शब्द उमटताहेत तरी कोठून? साता पहाऱ्यांच्या बंदोबस्तां-तून उमटणारे हे अचंब्याचे शब्द, "संभ्या, जागा हो, आणि राजवटीचा मार्ग धर" ही आबासाहेबांची स्वप्नांतील सांगी आणि गडावरची 'जिवलग जिवां-

ऱ्या गांठीभेटी अंतरतील' ही राणीसाहेबांची करुणवाणी ह्या सगळ्यांच्या एकजीव जुळणीनें खरोखरीच ही वैऱ्याची रात्र असावी असें वाटूं लागतें. कब्जी, स्वतःच बंदोबस्त तपासून ढिलाई नाहीं म्हणतां, मग ह्या नजरबंदीची सांगड तरी कशी—

**कलुषा**:—हं, हं, हं ! हे सगळे पिशाचाचे चाळे आहेत. हुजूर, चंड-मुंड महिषासुरमर्दिनीच्या महामंत्राची सिद्धि साधायची असल्यानें "अप-क्रामंतु भूतानि पिशाचाः सर्वतो दिशम् । सर्वेषामविरोधेन " अशी विधि-पूर्वक मीं मंत्रसिद्धीची भूमि भारून घेतली आहे. त्यामुळें अंतराळांत वावर-णाऱ्या भुतांखेतांच्या आतां अशाच चेष्टा चालायच्या ! त्यांत अपूर्वाई नाहीं.

**संभाजी**:—कब्जी, अंतराळांत वावरणाऱ्या भुताखेतांची माया असो, कीं आम्हां भोंसल्यांच्या पाठीराख्या मायभवानीची दया असो; या शब्दांचा आबासाहेबांच्या सांगीशीं मेळ बसला ! बस्स झाली खात्री ! आतां येथें बेनिगा रेंगाळण्यांत मतलब नाहीं. ह्याच घडीला रायगडीं कूच व्हायला पाहिजे.

**कलुषा**:—जगदंब, जगदंब ! हा काय बेभान मनसुबा हुजूर ! जंगल-शिकारींत नरडीवर उडी घेतलेल्या वाघाला ज्या खाविंदांनीं नुसत्या हातांनीं फाडून काढला त्यांना भुताखेतांच्या किंकाळ्यांनीं धडकी भरेल, हें नाळ कापली नाहीं त्या पोराला तरी पटेल का? चाकराची चेष्टा तर मांडली नाहीं महाराजांनीं ?

**संभाजी**:—कब्जी, अशा नसत्या शंकाकुशंकांनीं घडी गमवूं नका उगीच. मराठेशाहीच्या कर्त्या मोहोऱ्यांची कतल करून आमची कर्तबगारी आम्हाला कसाला लावावी लागली आहे ! अशावेळीं जिवाच्या फिकीरीनें नाहीं; पण रियासतीच्या तोलासाठीं तरी वैऱ्यांच्या रात्री आम्हीं गाफील-गिरीनें घालवितां कामा नयेत. जंगलशिकारींत वाघसिंहांनीं छाती फोडली किंवा समरांगणावरच्या संगीनधुमश्चक्रींत तोलाच्या समशेरबहाद्दरांनीं आमची गर्दन मारली, तर त्यांत आमच्या दिमाखाला बाध नाहीं; पण ना स्वारी ना शिकार, अशा मंत्रतंत्राच्या नादानींत दुस्मानांनीं घातपात केल्यावर ह्या दारुड्याचा, अखेर निशापाण्यानेंच नाश झाला; तुळशीसारख्या छेलछबेल्यांच्या रंगढंगांत गुंगलेला छंदीफंदी संभाजी, साऱ्या रियासतीचें

वाटोळें करून उलथून गेला; अशी पिढ्यान्‌पिढ्या आमची बदनामी चालेल. म्हणून म्हणतों आपण जलदी करूंया.

**कलुषाः**—पण हुजूरनीं असें ग्रहणाआधीं वेध लागल्यागत, मरणाआधीं मरणकळा आल्यागत घोरांत कां पडावें समजत नाहीं! असल्या वळवाच्या वादळानें कां धरणीकंप होत असतो?

**संभाजीः**—(स्वगत) अरे! रातदिन आमची थुंकी झेलणाऱ्या ह्या चाकरानें जों जों कूच करण्याची आम्हीं जलदी करावी तों तों दिरंगाई कां मांडावी बरें? जिव्हाळ्याच्या शब्दांनीं रङ्‌गं कोसळेल इतकें आमचें मन हळवें बनलें असतां ह्याचा हा कळवळा मस्तकांत कां तिडकत जातो? शेषाचें सोंग धरून विषारी कालिया तर आमचेभोंवतीं घोंटाळत नाहीं ना? राणीसाहेबांच्या शब्दांप्रमाणें खरोखरच आमच्या जिवाचा ह्यानें बाजार मांडला नसेल ना? (उघड) कब्जी, अजून आमच्या हुकुमाची मातब्बरी वाटत नाहीं? भल्याबुऱ्या कामगिरींत हयातभर आमची मर्जी धरलीत म्हणून फिरून एकवार हुकूम देतों; इथें रेंगाळण्यांत धोका आहे. कूच करूं या. राणीसाहेबांना चिमुकल्या बाळराजांना एकदां बघावेंसें जिवानें घेतलें आहे. आतां लगबग करूं या.

**कलुषाः**—नाहीं हुजूर. चाकरजातीनें मर्यादा ओलांडल्यावांचून निभाव नाहीं. दिलगिरीनें धाडस करतों याबद्दल क्षमा असावी. खाशांच्या एवढ्या हुकुमाची तामिली मला करतां येणार नाहीं.

**संभाजीः**—कोणाच्या हुकुमाची तामिली करतां येणार नाहीं? बेवकूफ! फिरून असा बेताल बडबडशील तर जीभ बुंध्यासकट हांसडली जाईल!

**कलुषाः**—सुखासुखी ही त्रिशंकूची अवस्था कपाळीं येत आहे हुजूर! नाहीं नाहीं असें तीनतीनदां आढेवेढे घेत असता मर्जी खप्पा झाली म्हणून खाशांच्याच राजीखुशीनें ही मंत्रतंत्राची यातायात मांडली! मंत्रसिद्धीपावेतों ह्या मांत्रिकाच्या मंत्रतंत्रावेगळे आम्ही जाणार नाहीं; अशी मांत्रिकाच्या वचनीं गुंतली आहे स्वारी! मग मंत्रसिद्धीची समाप्ति जवळ आल्यावर, वचनभंगाचें पाप पत्करून रायगडचा मार्ग धरणें गैरइनसाफी होईल; आणि अशा गैरइनसाफीलही महाराजांची मी खुशामत करीत

गेलों, तर मंत्रसिद्धीच्या सांगतेच्या अभावीं, संतप्त झालेली चंडमुंडमहिषासुरमर्दिनी माझा बळी घेईल हुजूर !

**संभाजी**:—हैवान, मोहोबतीनें तुला रंकाचा राव, भणंगाचा बाजीराव बनविला, त्याच्या फर्जंदांच्या मस्तकावर नाचविला, तो आमच्या जिवाशीं घोर जुगल्यावर तुझ्या जिवाची तूं कदर करावी म्हणून नाहीं. बापजन्मांत कधीं तट्टावर बसायची दक्कल नसेल त्या तुला हत्तीअंबारींतून मिरवूं दिला, ते आम्ही वैऱ्यांच्या वणव्यांत होरपळत असतां तुझ्या जिवाला तूं अडोसा बघावास म्हणून नाहीं ! निमकहराम, पाय लागला तर मस्तक ज्यांच्या पायावर आम्हीं नमवावें, ती जिवाची राजलक्ष्मी लाथाडून तुझी सोबत केली, त्याचे पांग असे फंदफितुरीनें फेडतोस ? [नरडीवर हात देतो.

**कलुषा**:—कोण शाबीत करतो मी फितूर आहे म्हणून ?

[ चंद्रावळ येते.

**चंद्रावळ**:—शाहीराची ही चंद्रावळ शाबीत करते तूं फितूर आहेस म्हणून!

**संभाजी**:—शाईराची चंद्रावळ ? रायगडावर कैदेंत कोंडलेली चंद्रावळ संगमेश्वरीं कशी ?

**चंद्रावळ**:—लाजलज्जा गुंडाळून ठेवून लाजिरवाण्या गोष्टी कशा सांगाव्या मायबाप ? ही गरिबाची घरवाली राजीखुशीनें संगमेश्वरीं नाहीं आली. बळजबरीनें ही शाहीराची अब्रू अशी देशोधडीला लावली आहे सरकार !

**संभाजी**:—कोणीं देशोधडीला लावली !

**चंद्रावळ**:—आम्हां मावळमराठ्यांचा हा राजा ज्यानें मरणाच्या दारीं आणला, नवकोट रियासतीच्या ह्या पालनहाराचा फंदफितुरीनें ज्यानें नाश मांडला, गाईब्राह्मणांच्या ह्या पोशिंद्याचा गोठ्यांतल्या गुरांढोरांगत ज्यानें बाजार केला, त्याच ह्या—ह्या कसाबानें ही सासुरवाशीण अशी देशोधडीला लावली आहे आणि थोड्याच अवकाशांत—

[ तोफेचा आवाज होतो. नौबती, शिंगें वाजतात. दीन, दीन !
हरहर महादेव असा हलकल्लोळ ऐकूं येतो.
खंडूजी खिडकींतून उडी घेतो.]

संभाजीः—अरे, हें काय ?

खंडूजीः—दगा, दगा! घात झाला हुजूर! विश्वासघात झाला! मोगल मुकर्रबखानाच्या फौजेनें वाडा अवचित घेरला हुजूर! दरवाजावर सगळ्या मावळ्यांची शिरक्यांनीं कत्तल चालविली आहे. बचावाला एकही मार्ग उरला नाहीं. ह्या—ह्याच कर्मचांडाळाची संगत नडली. सगळ्या महाराष्ट्राचें वाटोळें झालें! [दीन, दीन, हरहर महादेव!]

संभाजीः—अहाहा! मस्तक बधीर झालें! पाषाणासारखी छाती छिन्न-विच्छिन्न झाली! दर्याच्या दिमाखानें उसळणारी महत्त्वाकांक्षा क्षणार्धांत धुळीपांगळी बनली. कर्मचांडाळा! हिंदूंची कूळ, कुडी शिणवून वैऱ्याचा उदोउदो केलास? भोग, भोग आपल्या कर्माचीं फळें! [कब्जीच्या उरावर बसून नरडें दाबतो.] पण आतां तुझा जीव घेऊन तरी काय होणार? गाईब्राह्मणांचा प्रतिपाळ हें छत्रपतींचें ब्रीद असतां मरणकाळीं तरी ब्रह्महत्या नको आमच्या हातून व्हायला! जा, तुला जीवदान देतों; हो चालता! [लाथ मारून त्याला घालवितो., दीन, दीन! असा शब्द होतो.]

खंडूजीः—[खिडकींतून तिरंदाजी करीत असतां] शाबास, शाबास! शहाण्णव कुळींच्या समशेरबहाद्दरांनो, भले शाबास! मावळरियासतीचें नांव राखिलेंत, हा पहा फिरून मुकर्रबखानचा हल्ला आला! सरसावा भाले! करा गर्जना! बोला हरहर महादेव! अरेरे! त्या शिरक्यांच्या कारस्थाला कोणी ठेचारे! अहाहा! घात झाला! एकाएकीं वाड्याचा दिंडीदरवाजाच कोसळला! विश्वास—विश्वासघात! बेबंदशाहीनें महाराष्ट्राचें वाटोळें झालें!

संभाजीः—आतां अश्रु ढाळून काय उपयोग? खंडूजी, आटप, मायभवानीची गर्जना कर; दो दो हातांनीं समशेरी फैलावीत वैऱ्यांवर उड्या घेऊं! अभिमन्यूच्या अवसानानें मरूं किंवा मारूं! शिपायाचा शेवट समरांगणींच व्हायचा! घे कुळस्वामिनीचें नांव! बोल हरहर महादेव!

चंद्रावळः—नाहीं, महाराज नाहीं. ह्या कडव्या पठाणांच्या गर्दींत असा प्याद्यावारी फरजंद द्यायला आम्ही तयार नाहीं. खितलीच तर बघतां येईल; पण तोंवर मी आलेल्या ह्या भुयारानें महाराजांनीं—[दीन दीन!]

संभाजीः—दीन, दीन अशी दुस्मानांनीं छातीवर गर्जना मांडली असतां, जातीच्या जातिवंतांचे नजरेसमोर मुडदे गाडले जात असतां,

बायकी भ्याडबुद्धीनें मागच्या मागें पळ काढणाऱ्या नादान बापापोटीं संभाजीचा जन्म झाला नाहीं ! हट् बाजूला !

**खंडूजीः**—छे, छे ! हुजूर, सुवासिनीच्या शब्दाला आतां असा मोडा घालून कल्याण व्हायचें नाहीं. चंद्रावळीची मसलत दिसायला बायकी थाटाची दिसली तरी गरजेला अकलमंदीची आहे. 'लाख मेले तरी लाखांचा पोशिंदा जगावा लागतो' हुजूर ! अलमगिराच्या बंदिखान्यांतून आबासाहेब मेवामिठाईच्या ढोंगानें पेटाऱ्यांतून फरारी झाले ! पावनगडच्या खिंडीला जिवाचा अडसर घालून झुंजार बाजीनें धनी सहीसलामत गडावर पावते केले. मग वाडवडिलांचे हे दाखले धडधडीत दिसत असतां त्यांच्याच आम्हीं कच्चाबच्चांनीं तरी, उसळत्या वीरश्रीनें खाशांना त्या वणव्यांत कशी उडी घालू द्यावी ? हुजूरच्या समशेरबहादुरीची दुनियेला शंका नाहीं ! पण वैऱ्यांनीं अवचित असा हजारों समशेरींनीं दावा साधल्यावर हुजूरचा गनिमी-काव्याशिवाय कसा निभाव लागेल ? [ दीन, दीन, दीन ] हा पहा दुस्मान भिडला हुजूर ! [ खंडूजी संभाजीची तरवार काढून घेतो. ] आतां त्वरा व्हावी.

[ चंद्रावळ वाट दाखविण्यासाठीं भुयारांत आधीं उतरते. मागोमाग खंडूजी उतरून शंभुराजांना हात देत असतात; इतक्यांत भुयारावर भिंत कोसळून खंडूजी खालीं दडपला जातो. ]

**संभाजीः**—अरेरे ! हें काय ? [ पडद्यांत गणोजीः—सूड ! सूड ! माजोरी राजा, शिर्क्यांनीं हा शिरकाणाचा सूड उगवला सूड ! ] कोण चांडाळ हा ? आम्हांवर सूड उगवला म्हणून शिरा ताणतो आहे !

[ गणोजी पडक्या भिंतींतून बाहेर येतो.

**गणोजीः**—तुझा हा हाडवैरी गणोजी शिर्के तुझ्यावर शिरा ताणतो आहे !

**संभाजीः**—कोण गणोजी शिर्का ? कुऱ्हाडीचा दांडा गोतास काळ झालेला गणोजी शिर्काच हा ! निमकहराम! घे, घे तर घरभेदाचें प्रायश्चित्त !

[ शंभुराजे धांवून जातात; इतक्यांत भिंतीवरून भाले सरसावीत अरब पुढें होतात. शंभुराजे किंचित् मागें होतात. तोंच मागचे बाजूनें कांहीं अरब येऊन एकाएकीं राजांना काढणी लावितात. मस्ती चालू असते. ]

**गणोजीः**—खबरदार! मस्त मनुष्या, मृत्युमुखांत पडल्यावर कां उगीच जिवाची जिकीर करतो आहेस? आटप, मरणाला तयार हो. ज्याच्या भावाबंदांचीं रक्तबंबाळ मस्तकें पोरखेळांतील चेंडूप्रमाणें अस्मानांत उडवलींस त्याच्या मानी बीजाचा हा शिर्के तुला मरणाची सजा फर्मावीत आहे. चल, झुकव गर्दन पुढें!

**संभाजीः**—नादान! तुझ्या बापजाद्यांच्या राजाची—छत्रपतीची ही गर्दन बादशहांच्या बादशहापुढें झुकली नाहीं; ती तुझ्यासारख्या पंढापुढें झुकेल काय? शंभुराजांनीं तुझ्या भावाबंदांचीं शिरें मारलीं तीं मनगटाच्या भरभक्कम बळानें, मैदानांत सिध्या इष्मीनें मारलीं आहेत! नवरदेवाच्या हाताला हात लावणाऱ्या नव्यानवरीच्या दुबळाईनें हा दुष्मनाच्या पायपोसापाशीं गेला नाहीं! नेक जातीच्या मराठ्यापोटीं जन्म घेऊन मराठ्यांच्याच राजाची तुला कतल करायची असेल, भोंसल्यांच्या सिंहासनावर सुडाचे निखारे रचून मोगलांच्या मोहबतीनें महाराष्ट्राची जाळपोळच तुला करायची असेल, तर ही संभाजीची निधडी छाती तयार आहे! खुपस तरवार!

**गणोजीः**—ही पहा समशेर! सुडाच्याच उतावळीनें नंगी तळपते आहे! घे देवाचें नांव; मराठ्यांचा राजा ऐस कीं शककर्त्याचा बेटा ऐस! पिंडीवर बसला म्हणून विंचवाची गय नाहीं! [**गणोजी** घाव घालणार तोंच **मुकर्रबखान** येतो.]

**मुकर्रबः**—खबरदार! शिर्के, किनके गर्दनपर समशेर चलाते हो?

**गणोजीः**—दुस्मनके गर्दनपर समशेर चलाते है!

**मुकर्रबः**—नहीं राजाजी. संभाजीराजे आपके दुष्मन हो या न हो; उन पर हम नहीं समशेर चलवा देंगे!

**गणोजीः**—क्यं?

**मुकर्रबः**—कुल मरहट्टेके बादशहा संभाजीमहाराजको जिंदे ले आनेका हमे बादशाहका हुक्म है!

**गणोजीः**—सबब्?

**मुकर्रबः**—संभाजीमहाराज इस्लामी बन जायेंगे तो बादशहा उन्हे जिंदे छोडने वाले है!

**गणोजी**:---काय ? संभाजीनें इस्लामीधर्म पत्करला तर अलमगीर बादशहा त्याला जिवंत राखणार ? मग जातगोताची दावेदारी पत्करून मी परक्यांची मोहोबत ज्या सुडासाठीं केली त्या सुडाचें काय ?---

## अंक तिसरा समाप्त

# अंक चवथा

## प्रवेश पहिला

[स्थळ—मोगल छावणी. पात्रें—खंडूजी.]

खंडूजीः—शंभुराजांना गिरफदार बनवून मोगलांनीं त्यांना तुळापुराकडे चालविलें आहे, अशी दुःखदायक वार्ता शाहीराबरोबर रायगडीं धाडली आणि राजांच्या सुटकेपायीं अशा मौलवीच्या वेषानें मी तुळापुरांतल्या ह्या बादशाही छावणींत धांवलों खरा; पण समुद्रागत रानोमाळ पसरलेल्या ह्या मोगली फौजफाट्याकडे बघितलें, कीं निराशेनें चित्त भांबावून गेल्याशिवाय रहात नाहीं. बघावें तिकडे दुष्मन ! प्रसंग पडलाच तर कोणी कोणी नाहीं हाताशीं ! नाहीं म्हणायला, शंभुराजांना इस्लामी धर्माची दीक्षा देऊन, मराठेशाहीला शह देण्याच्या मतलबानें औरंगजेबानें, शिर्क्यांना शंभुराजांचा सूड उगवूं दिला नाहीं; म्हणून गणोजी बिथरून गेला आहे एवढाच काय तो एक आशेचा किरण ! लोखंड तापलें आहे तोंच त्याच्यावर घाव घालावा अशा इराद्यानें मी शिर्क्याच्या मुलाखतीला निघालों आहें. रमल जाणणारे कोणी एक मौलवी आपल्या मुलाखतीला येत आहेत, असा आगाऊच सांगावा धाडला आहे. इतकें केल्यासारखें शिर्क्याची मुलाखत मिळो म्हणजे झालें. [ जातो.

# प्रवेश दुसरा

[ **स्थळ**—तुळापुराजवळील बादशहाची छावणी. पात्रें—**गणोजी**.]

गणोजीः—कोण आहेरे पहाऱ्यावर? [ **पहारेकरी** येतो.

पहारेकरीः—जी.

गणोजीः—तूं मोगलच आलास का? ठेंच लागलेल्या बोटालाच पुनः पुन्हा धक्का लागावा तसें, नको तेंच कसें अचूक समोर येतें! मोगल! मोगल म्हटला, कीं आतां तळपायाची आग मस्तकाला जाते! औरंगजेबाच्या आपमतलबीपणाचें संगमेश्वरचें तें चित्र एकदम दृष्टीपुढें उभें रहातें! आणि एकजात सगळ्यांची कत्तल करीत सुटावेंसें वाटतें! पण काय करूं; छावणींतल्या ह्या लाखोगणती फौजेपुढें कसा टिकाव धरूं? पहाऱ्यावर कोणी मराठा नव्हता कारे?

पहारेकरीः—नव्हता राजाजी.

गणोजीः—बरें, जा नीघ पहाऱ्यावर! आणि हें पहा, रमल जाणणारे कोणी बुढ्ढे मुशाफीर मुलाखतीला येतील. ध्यान राख! [ **पहारेकरी** जातो.] बाकी रमल तरी आतां विधिलिखिताला कसा बाध आणणार! कृतकर्माचे झाडे माझे मींच दिल्यावांचून कुठली ह्या जिवाची तळमळ शमायला? माणसाचा मनोविकारांवर ताबा राहता तर किती बरें होतें! ह्या गणोजीला अशीं पोरीप्रमाणें आंसवें ढाळायचें कांहीं कांहीं कारण नव्हतें! पण द्वाड, दीर्घद्वेषी मी! संभाजीच्या आकसानें जन्मजन्मांतरींच्या वैऱ्याची मोहोबत पत्करली, आणि अखेर मृगजळाच्या मागें धांवणाऱ्या मृगागत तळमळून रक्त ओकून मरायची पाळी आली! सुडापरी सूड घेतला नाहीं, स्वकीयांपरी स्वकीय अंतरले—परके ते परके झाले. आणि गणोजी मात्र एकटा—या अफाट जगांत अगदीं एकटा पडला! इतःपरही मोगलांच्याच आसऱ्यानें जन्म कंठीन तर मानी मनाचा कोंडमारा असह्य होऊन काळीज फुटून निघणार! परत मराठ्यांची फळी संभाळून मोगलांचा फडशा उडवीन तर ह्यातून शंभुराजांच्या नाशाचें पाप घडलेलें! गगनांतून धरणीवर कोसळतांच काळा ठिक्कर पडलेला दगड तारारूपानें फिरून कसा गगनांत चढणार?

[ पडद्यांत दवंडी—उल्मुल्क् अलमगीर बादशहाके तमाम फौजोको जाहीर कीया जाता है के मुगल बादशाहीके दुष्मन, कुल मरहट्टेके समशेर-जंग पादशहा संभाजीराजाको गिरफदार बनाकर मुकर्रबखान साहेबनें बादशहाके सामने हजीर किये है. इस खुशखबरीके लिये सब लढाऊ मुलाजमोको दिल्चाहेसो खानेका, खिलवानेका, पीनेका, पिलवानेका, आतशबाजी वगैरेका बेइजाजत अखत्यार दिया जाता है !] नको, नकोत हे विपारी शब्द ! जीव गुदमरून निघतो. कुलमराठ्यांचा समशेरजंग पादशहा गिरफदार झाला ! ह्या ह्या गणोजीनेंच वैऱ्यांना आपल्या दिमाखाचा असा डांगोरा पिटायला वाव करून दिला ! नाहीं सहन करवत आतां हें माझें कृत्य मला !

[ **पहारेकरी** येतो.

**पहारेकरी**:—मौलवीसाहेब आले.

**गणोजी**:—येऊं दे आत. [ **पहारेकरी** जातो. **मौलवीसाहेब** येतात. पूर्ववत् दवंडी होत असते.] कुलमराठ्यांचा समशेरजंग बादशहा गिरफदार झाला !

**मौलवी**:—राजाजी ! तुम्ही हिंदुलोक आल्या अभ्यागताचे अंतःकरणपूर्वक स्वागत करतां. आम्हां परमुलखीयांची दिलसफाई मोहोबत पत्करतां असें माझ्या भाईबंदाच्या तोंडून मक्कस मी नेहमी ऐकत असे, तें अनुभवाअंती लटकें ठरेल अशी बिलकूल अटकळ नव्हती !

**गणोजी**:—व्यग्र मनःस्थितीमुळें अवधान राहिलें नाहीं; दिलगिरी वाटते. बाकी आम्ही हिंदु लोक म्हणाल तर खरोखरीच मोठया दिलसफाईनें तुम्हां परकीयांची मोहोबत पत्करतों. इतकी पत्करतों कीं, आमची मोहोबत मोडून परकीयांना आमच्या देशांतून जाववतच नाहीं. घरादागाचा पसारा मांडून, नाइलाजानें त्यांना मग इथेंच राज्यें स्थापावीं लागतात ! आणि राज्याच्या सुखरूपतेपायीं हिंदूंच्या आपापसांतील भाऊबंदकीचा फायदा उठवून शंभुराजासारख्या समशेरजंगाची त्यांना डोकीं ठेचावीं लागतात ! [ दवंडीचा डंका वाजतो.] ऐका; ऐका हा परकीयांच्या मोहोबतीपायीं आम्ही हिंदुलोक स्वकीयांचीच कशी राखरांगोळी करतों त्याचा हा डांगोरा नीट कान देऊन ऐका ! [ दौंडी पुरी होते.]

**मौलवी**:—तोबा, तोबा! काय सांगतां राजाजी! कोणीं हिंदूनेंच आपल्या राजाचा असा घात केला म्हणतां?

**गणोजी**:—होय. मौलवीसाहेब, एका हिंदूनें—तुमच्या डोळ्यांतील अश्रू बघून दिल खुला केल्याशिवाय रहावत नाहीं—जातिवंत अशा एका मराठ्यानेंच ही कृतांतकृति केली बरें!

**मौलवी**:—अरेरे! कोण कर्मचांडाळ हा! स्वतःच्याच घरावर हे झळझळीत निखारे ठेवायला त्याचा हात वाहवला तरी कसा?

**गणोजी**:—सुडाच्या तिरमिरीनें तो वेडापिसा बनला होता. संभाजी आणि संभाजीचें राजेपण यांतलें अंतर खुनशीपणाच्या भरांत त्याला जाणतां आलें नाहीं. शंभुराजांच्या शिरीं सुडाची जळती ज्योत तेवत ठेवल्यानें अवघ्या दौलतीची रक्षा होईल हा साधा सुविचारही त्याच्या चित्तीं तेव्हां रिझला नाहीं.

**मौलवी**:—असा हा क्रियानष्ट हल्लीं आहे तरी कुठें!

**गणोजी**:—मौलवीसाहेब, मीच मीच तो क्रियानष्ट बरें!

**मौलवी**:—काय सांगतां राजाजी? तुम्हीं—तुम्हीं हें रौरवाचें साधन जोडलेंत? राजाला देव मानणाऱ्या हिंदु मायमाउलीची कूस शिणवून तुम्हीं आपला राजराजेश्वर दुष्मनांच्या बंदिखान्यांत दवडलांत! अरेरे! धिक्, धिक् तुमचें जिणें! शिर्के, शिर्के, हें काय केलेंत? कसली कसाबकरणी ही?

**गणोजी**:—नका, नका: मौलवीसाहेब, माझी राक्षसी वृत्ति पश्चात्तापानें जळून खाक झाली आहे. आतां असे मेलेल्यावर घाव घालूं नका.

**मौलवी**:—काय सांगूं राजाजी, हा मौलवी दिसायला दुःखितांवर घाव घालणारा कठोर पाषाण दिसत असला तरी पोटांत—ह्या पाषाणाच्या पोटांत—तुम्हांविषयींच्या मायेची सोज्ज्वळ गंगा तुडुंब दाटली आहे आणि तिनेंच तुमच्या आणि शंभुराजांच्या उद्यांच्या उज्ज्वल भविष्यापायीं भगीरथ यत्नानें त्याला आपल्या मुलाखतीला दाखल केलें आहे.

**गणोजी**:—कनवाळु आहां मौलवीजी! जानपैछान नसतां भूतदयेनें कळकळ दाखवलीत! देव कल्याण करील आपलें! बाकी भविष्याविषयीं म्हणाल, तर उद्यांच्या त्या भयाण भविष्याच्या यमयातनांचा तो देखावा

आतांच माझ्या दृष्टीपुढें मूर्तिमंत थैमान घालतो आहे. हा क्रूर बादशहा आतां कृतांताप्रमाणें शंभुराजांचा छळवाद मांडील. ज्यांच्या दृष्टीला भिडवतांना समरांतल्या संगीन झुंजाराचीही नजर नजरबंदींत पायाशीं नमावी त्यांच्या तोंडावर हा अलमगीर आतां हिंदुधर्माची विटंबना मांडील. आणि अखेर यज्ञपशूप्रमाणें राजांना–नको नको ती कल्पना! मौलवीसाहेब, तुम्ही परके असलांत–प्रत्यक्ष अलमगिराला माझी मनीषा सांगून चुगलखोर बनलांत तरी पर्वा नाहीं–तळतळाटानें तुम्हाला सांगून ठेवतों, कीं इतःपर मोगलांचा एक सत्यनाश! आणि तो सत्य करण्याकरितांच ह्या गणोजीचें आयुष्य खर्चीं पडेल!

**मौलवीः**—हं, हं! राजाजी, तुम्ही आहां कुठें आणि बरळतां काय? प्रत्यक्ष बापाला बंदिखाना दाखवणाऱ्या बादशहाच्या छावणींत आहांत हें विसरून गेलांत? शिर्के, अशाच उमाळीनें आजपर्यंत सोन्यासारख्या आयुष्याची माती करून घेतलीन! आतां तरी असे बेभान बनूं नका. अन्यायाची चीड असणें हा सद्‌गुण खरा; पण तो व्यक्त करतांना काळवेळेची अनुकूलता पहावी लागते. इष्टांनिष्ट परिणामावर लक्ष द्यावें लागतें.

**गणोजीः**—इष्टानिष्ट परिणाम! मौलवीसाहेब, अवघी हयात अनिष्टांनीं वायां गेल्यावर इष्टानिष्टाची पर्वा काय कामाची? माझी वृत्तीच आतां बेफाम बनली आहे! मोगल म्हटला, कीं काय करूं आणि न करूं असा चेव भणभणतो मस्तकांत!

**मौलवीः**—छे, छे! राजाजी, आतां असें विकारांच्या आहारीं जाऊन कसा निभाव लागणार? मोगलांचा आपल्याला संताप यावा हें एकापरी रास्तच आहे; पण समजा, कीं संगमेश्वरीं मुकर्रबखान हरकत न घेता, तर उगारलेल्या समशेरीनें तुम्हीं तुमच्या राजाची गर्दन मारली असतीत ना? मग ज्यांची तुम्हीं गर्दन मारली असतीत त्यांच्यासाठीं अश्रु कां ढाळतां? आणि मोगलांचा एवढा राग कां करतां?

**गणोजीः**—मोगलांनीं बेमानी केल्यामुळें माझें माथें भडकलें आहे.

**मौलवीः**—म्हणजे ज्यांच्या नुसत्या कैद होण्यानें तुमच्या डोळ्यांना पाणी आलें त्यांची मोगलांनीं तुम्हाला गर्दन मारूं दिली नाहीं असेंच ना? राजाजी, असे परस्परविरोधी विकारांनीं गोंधळूं नका! शिर्क्यांच्या शिर-

काणामुळें शंभुराजे तुमच्या सुडाचा विषय बनले होते, म्हणून त्यांच्यावर समशेर उगारतांना आपल्या खुनशी वृत्तीनें नेट धरला: पण ऐन घाव घालायच्या घडीला मोगलांनीं आकस्मित आपलीं नखें बाहेर काढतांच मतलबी मोगल आपल्या रागाचा विषय बनले आणि शंभुराजांकडे जरा सौम्यपणानें आपल्याला पहातां आलें; म्हणून तुमच्या नेत्रांत अश्रु संभवले. व्यक्तिद्वेषाच्या भरांत वैऱ्यांच्या गळ्यांत गळा घालून दख्खनदौलती-वरून नांगर फिरवायचें पातक आपण करीत आहों असा आपल्याला पश्चात्ताप झाला ! मग राजाजी, या अनुभवानंतर तरी राजकारणांत विकाराच्या ऊर्मी आहारीं राखाव्या. सदा मतलबाचे मंत्र जपणाऱ्या औरंगजेबानें मारलेली भेदनीतीची मूठ, चोरकसबानें हळूच शंभुराजांची सुटका करून त्याच्यावरच उलटवावी हें शहाणपण नकोका शिकायला तुम्हीं ?

गणोजी:—मौलवीसाहेब, आपण मौलवीच आहां का ? तुम्ही दुष्मनांचे जातभाई आहां ह्या जाणिवेची आधींपासूनच अंतर्यामीं बोचणीं लागलेली असतांही सदय दिसलांत म्हणून स्वाभाविक दिल खुला करीत गेलों; पण शंभुराजांच्या सुटकेची सल्ला देऊन माझ्या मनाचा कांहीं विलक्षण गोंधळ उडवलांत ! खुदाची कसम खाऊन सांगा, आपण कोण आहां ? जात दुष्मनाची आणि कळकळ मराठ्याची अशी ही कडू कारल्याला मधुरता कशी संभवली ? औरंगजेबानें माझ्या बिथरलेल्या अंतर्यामाचा ठाव घ्यायला धाडलेले कोणी हेर; मोगली जुलमानें गांजलेले त्याचे कोणी दावेदार; कीं मारून बनविलेले मुसलमान हिंदु; आहां तरी कोण ?

मौलवी:—मी कोण ? कसें सांगूं शिर्के. दैवगति मोठी विचित्र आहे. मी कोण आणि आई चुकलेल्या पाडसागत सैरावैरां धांवत कां सुटलों हें एकाएकीं कसें स्पष्ट करूं ? शिर्के, राजकारणाच्या जुगारांत राजा हरवून बसलेला, पेहेरावानें परका पण पिंडानें मराठा असा मी एक कमनशिबी मौलवी आहे ! मरणाची मला पर्वा नाहीं; पण जिवाशीं बाळगलेला हेतु सफल झाल्यावर मृत्यु यावा एवढेंच त्याचें वांच्छित आहे. राजाजी, अज्ञातवासी पांडव अकालीं प्रगट होते तर काय झालें असतें, सांगाल काय?

गणोजी:—एकूण शंभुराजांपायीं मौलवीच्या सोंगानें या मोगल-छावणींत धांवलेले कोणी मराठे आहांत तर तुम्ही ?

**मौलवी**:—होय राजाजी ! संगमेश्वराच्या वाटचालींत मोगलरिसाला घेऊन बहिणीचा मेणा मारायला आपण धांवलांत तेव्हां स्वतःच्या बहिणी-ला हिरकणी चारून ज्यानें बेशुद्ध स्थितींत मासाहेबांना रायगडची बिकट वाट तुडवायला लाविली; राजांच्या जिवाचा घोर घेऊं नका, खाशांना लवकरच मुलाखतीला घेऊन येतों, अशी कळकळीची सांगी दिल्यावर राजाशिवाय त्या साध्वीसमोर जाण्याची पाळी ज्याच्या कपाळीं आली तो कपाळकरंटा मी खंडूजी ! राजांच्या जिवाची भिक्षा मागण्याकरतां आपल्या दारीं आलों आहें !

**गणोजी**:—कोण खंडूजी ?

**खंडूजी**:—होय, खंडूजीच मी ! शिर्के, सांगा, शंभुराजांशिवाय राजाराम-महाराजांना हें काळें तोंड कसें दाखवूं तें सांगा ! ह्या खंड्याला एकटा रायगडीं परतलेला बघून 'राजे कुठें आहेत?' अशी मासाहेबांनीं गहिंवरानें किंकाळी फोडली म्हणजे कुण्या उत्तरानें त्यांचें सांत्वन करावें तें सांगा ! 'मला महाराजांकडे न्या' अशी त्या साजऱ्या चिमण्या राजांनीं किलबिल मांडली तर त्या कोंवळ्या पिलाला कसला चारा देऊन महाराजांचा विसर पाडूं एवढें मला समजवा !

**गणोजी**:—परमेश्वरा ! नको, नको हें लाजिरवाणें जिणें ! ह्या मूर्तिमंत स्वार्थत्यागाला आतां जाब तरी काय देऊं ? तोंड असून मुका, जिवंत असून मेल्यासारखा–मला ह्या स्वामिनिष्ठापुढें उभा करण्यापेक्षां देवा, मरण देशील तर या यातनांतून तरी माझी सुटका होईल !

**खंडूजी**:—छे, छे ! शिर्के, असें तोंड लपवूं नका आतां ! पश्चात्तापाच्या भरांत मरणाची इच्छा केलीत म्हणून परमेश्वर कसा पश्चात्तापानें मेलेल्याला मारील ? राजे, पश्चात्तापाची भावना मनुष्याच्या उन्नतीसाठीं परमेश्वरानें दिली आहे. मात्र पश्चात्तापाची जाणीव राखून कृतकर्माचें झाडे दिल्याविना सुटका नाहीं.

**गणोजी**:—खंडूजी, शंभुराजे राजे नसते तर जशास तसें या न्यायानें एकापरी माझें पाप मर्यादित झालें असतें. मीं चांडाळानें स्वतंत्रपणें सुडाची आटाआट केली असती तरीही पातकाला सीमा होती; पण

पिढ्यान् पिढ्यांच्या वैऱ्याला दौलतीची धुळधाणी करायला अवसर देऊन तळतळाट मीं माझ्या शिरावर घेतले आहेत ! अग्निनारायणाचा कोप अनावर झाला नाहीं तोंच त्याला शमवितां येईल; पण त्यानें प्रचंड ज्वालामुखीचें रूप धारण केल्यावर माणसाला हतबुद्ध व्हावें लागतें. तशीच माझी अवस्था झाली आहे. आतां ह्या वणव्यांतून कुठली सुखरूप सुटका व्हायला माझी ?

खंडूजीः—राजे, असे हताश होऊं नका ! वडवानळालाही दर्याखालीं दडपून टाकणाऱ्या देवदयेला अंत नाहीं. तसेंच भविष्याच्या पोटीं काय सांठवलें असेल याचाही कुणाला ठाव नाहीं. मग हताशपणानें असें कर्तव्यपराङ्मुख होऊन कसें चालेल ?

गणोजीः—मग पापक्षालनासाठीं कोणतें दिव्य करूं म्हणतां ?

खंडूजीः—पापक्षालनाचा, शिर्के, आतां एकच मार्ग उरला आहे. आणि तो म्हणजे कैदेंतून शंभुराजांची सुटका करणें हा होय !

गणोजीः—नाहीं. खंडूजी, पापक्षालनाला दुर्दैवानें तेवढीही संधी ठेवलेली नाहीं. अशा करामतीला वाव असता तर ह्या गणोजीनें शंभुराजांच्या हातापायांत खळखळणारे ते लोखंडी लंगर कचाकच तोडून काढून औरंगजेबाला आग्र्याच्या बंदिखान्यांतली आबासाहेबांच्या चातुर्याची आठवण कधींच करून दिली असती; पण गेल्या दाखल्यानें दुश्मन आतां खबरदार बनला आहे. कैद्याचा डेरा रोहिले पठाणांच्या भालेकैचींत काळ्याकुट्ट शिद्यांच्या रखवालींत खुद्द औरंगजेबाच्या शामियान्याजवळ पडला आहे.

खंडूजीः—मग काय मी एवढें जिवाचें रान करून दुश्मनाच्या गर्दींत धावलों तो फुकटच ! राजे 'होय' असाच जबाब देणार असाल तर कमरेच्या समशेरीनं माझी गर्दन तरी मारून टाका नाहींपेक्षां खराखुरा पश्चात्ताप जर आपल्याला झाला असेल, वैऱ्यांनीं राजांचा घात मांडलेला बघून महाराष्ट्रांतील बेबंदशाहीला तिलांजलि द्यावी असें खरोखरच शिर्क्यांच्या ह्या बीजाला वाटत असेल तर मरेतोंवर शंभुराजांच्या सुटकेचा यत्न करून तुम्हीं मराठ्यांना येऊन मिळायलाच पाहिजे !

गणोजीः—खंडूजी, माझ्या मनाची अवस्था कशी समजावूं तुम्हाला ? शिर्क्यांच्या बेचाळिशीची आण वाहून सांगतों, कीं जिवांत जीव असेतों

राजांच्या सुटकेची धडपड करीन; पण कुण्या कसबानें कारस्थान खेळूं एवढें मला दाखवून द्या.

**खंडूजीः**—राजांना ज्या कुणा हिंदूकडून अन्न दिलें जातें त्याच्याशीं नाहीं का सधान जोडतां येणार? बरें, अलमगिराची लाडकी शहाजादी—झिबुन्निसाची तरी मुलाखत मिळवितां येईल का आपल्याला ?

**गणोजीः**—खरेंच ! खंडूजी, नामी अक्कल सुचविलीत ! युक्तिप्रयुक्तीनें पण खात्रीनें त्यांची मुलाखत मिळवितां येईल. पण खंडूजी, पापी मन माझें, आधींच सांगून ठेवावेंसें वाटतें, कीं आपली ही धडपड वायां जाऊन शंभुराजांचें उद्यां कांहीं बरें वाईट झालें तर मासाहेबांच्या समोर कांहीं हें काळें तोंड मला आणवणार नाहीं. आणि मराठ्यांचाही माझ्यावर विश्वास बसणार नाहीं. तेव्हां आहे या स्थितीतच मला राहिलें पाहिजे.

**खंडूजीः**—ठीक आहे. जशी आपली मर्जी !

---

# प्रवेश तिसरा

[ **स्थळ**—बादशाही छावणींतील एक तंबू. पात्रें—हातापायांत बेड्या आहेत असे **संभाजीराजे**.]

**संभाजीः**—सृष्टीची उलथापालथ झाली नाहीं ना ? मुंग्यांनीं मेरुपर्वत गिळला नाहीं ना ? वडवानळानें समुद्र जाळला नाहीं ना ? मग आम्हीच असे कमनशिबी कसे, कीं समशेरीचे शिकंदर निपजून नालायकांची गत कपाळीं यावी ! राजकारणाच्या दर्यातला हा सीधा दर्यावर्दी असा बेअब्रूनें रसातळाला कां जावा ? ह्या मायावी जगांत विजयी चारित्र्य, सुखाचा मृत्यु लाभणें सीधेपणापेक्षां भाग्यावर अवलंबून असेल का ? जिवा, कां तळमळतोस आतां ? मनाचा मानी, माथ्याचा संतापी, क्रूर कर्दनकाळ तूं ! तब्येतीनें सीधा असलास तरी अकलेनें आडदांड निपजलास ! माणसांची पारख चुकलास ! संगतीची निवड हुकलास ! भले भरडलेस, खोटे कंठीं धरलेस ! कालचक्राला क्षमा मंजूर नाहीं. देहांताची तुला सजा फर्मावली जात आहे ! मर; धर्मांतर नको असेल तर दुस्मानांच्या दारीं कुत्र्याच्या

मोतानें मर! ही पहा तुझ्या गुन्ह्यांची मालिका! आबासाहेबांच्या खांद्याला खांदा लावून लढलेले, दौलतीसाठीं मोलाच्या हयाती वेंचलेले, नाहक ज्या थोरांचे मुडदे गाडलेस; त्या सर्वां—सर्वांचीं रक्तबंबाळ प्रेतें हीं तुझ्यापुढें आतां गोळा होऊं लागलीं पहा! हे अण्णाजी दत्तो रागारागानें इंगळाच्या डोळ्यांनीं तुझ्याकडे पहात आहेत! खुनशी शिर्क्यांचीं हीं कबंधें करकरून सुडाच्या मुठी वळीत आहेत! मस्त हत्तीच्या पायाखालीं चिरडलेले बाळाजी आवजी 'राजा, आबासाहेबांनीं समुद्रमंथनाच्या सायासांनीं एकत्र केलेल्या नररत्नांची अशी धुळधाण करतो आहेस खरा; पण घाई घाई रडावें लागेल' म्हणून बजावीत आहेत! ह्या पहा! ह्या पहा! भिंतींत चिणून मारलेल्या तुझ्या सावत्र मातेच्या करुणकिंकाळ्या! अहाहाहा! नका, नका; आईसाहेब! आणखी आतां अशा तळतळाटानें मनगटें चावूं नका! संभाजी नालायक ठरला! अन्नपाण्यावांचून आपला जीव घेणारा संभाजी आतां जिवंत रहात नाहीं! वैऱ्यांनीं लोहशृंखलांनीं बद्ध केलेला संभाजी, विश्वासघाताच्या गळफासांत गर्दन गवसलेला हा संभाजी, आंतड्याच्या तारा पिळवटून देवाजवळ आतां एवढीच याचना करतो आहे, कीं देवा! मला आतां मरण द्याल तें तरी मानाचें द्या! थोराचें द्या! मराठ्यांच्या राजाला शोभेशा मरणानें संभाजीला मरूं द्या! धर्माकरतां प्राणाची आहुति देऊं द्या. अरेरे! काय अवस्था आली ही? पोरवयांत हूडपणानें वडलांच्या वात्सल्याला चुकलों; थोर वयांत शाळुसोबत्यांच्या संगतीनें जिव-लगांच्या गांठीभेटींना मुकलों. भरतासारखा भाऊ सतत नऊ वर्षे कैदेंत कोंडला; 'खाशांना उपरती झाल्याविना रहाणार नाहीं!' अशी आयुष्य-भर आशा करीत बसलेली जिवाची राजलक्ष्मी लाथाडली! खंडूजीसारखा स्वामिभक्त—प्रत्यक्ष त्याच्या वडलांचा जीव घेणाऱ्या धन्याशींही स्वामि-निष्ठ राहाणारा खंडूजी—खंडूजी! [**खंडूजी** येतो.] काय खरोखरीच खंडोजी आला!

**खंडूजी**:—होय हुजूर. खंडूजीच मी!

**संभाजी**:—अरे, अरे, अरे! बेटा, कशाला आणखी धाडस केलेंस हें? कशाला हा हीन वेष पत्करलास?

**खंडूजी**:—कशाला हा वेष पत्करलास? असा निष्ठुर सवाल करवला

तरी कसा धनी ? मराठेशाहीच्या भवितव्यासाठीं, महाराष्ट्राच्या राजलक्ष्मीसाठीं खाल्ल्या मिठाला जागणारें चिटणिसांचें ब्रीद चैन पडूं देईना; म्हणून खंडूजी असा बहुरूपी बनला ! प्रत्यक्ष भगवंत पाठीराखे असतां, पांडवांना अज्ञातवास पत्करावा लागला; मग खंडूजीची काय कथा ! राजेश्वरा, हे दुर्दैवाचे खेळ आहेत ! तुमच्यामाझ्याच नव्हेत; सगळ्या महाराष्ट्राचे हे धिंडवडे आहेत. चाकरीनें ज्यांच्या भाकरीवर जीव जगवावा त्यांच्याच जिवासाठीं दुष्मनांच्या दिल्या अन्नाचे तुकडे घेऊन छद्मवेषानें खंडूजीनें असें धांवावें हें खडतर विधिलिखित आहे !

**संभाजी**:—पण खंडोबा, सूर्यापोटीं शनि निपजलेल्या संभाजीसाठीं, देवापोटीं दैत्य अवतरलेल्या ह्या कठोरासाठीं असें धाडस करून काय लाभ ! फिरंग्यांच्या स्वारींत भरधांव दौडतांना अवचित तोल जाऊन घोड्यासकट आम्ही खाडींत बुडत असतां तूं घोड्यासुद्धां संकटांत उडी घेऊन आमच्या घोड्याचा जेरबंद छाटलास ! परवां संगमेश्वरीं पाठीवर भाले सरसावून अरब धांवत असतां, अघाडीवर पठाणफौजा तटबंदीवर टकरा घेत असतां, हुशीसरसा वाड्यांत शिरून आमच्या बचावाची शिकस्त केलीस आणि आजही पुनः अशा लाचार वेषानें—नाहींरे नाहीं ! खंडूजी, तुझ्यासारख्या थोर थोर स्वामिभक्तांचें संभाजीला चीज नाहीं करता आलें ! संभाजीनें मरून तुम्हां पोटीं जन्म घेतल्यानेंही फिटावयाचे नाहींत असे थोर उपकार—

**खंडूजी**:—नका, नका ! राजेश्वरा, असें अभद्र बोलून चाकराला शरमिंदा करूं नका. चिटणीसांचें घराणें ऋणानुबंधाने भोसल्यांचें ऋणकरी आहे. हबशानें गलबतांत घालून बायकांमुलांसुद्धां गुलामांच्या बाजारांत विकायला धाडलेल्या चिटणिसांच्या घराण्याचें शिवाजीराजांच्या थोरवीनें जगांत नांव झालें आहे. चिटणिसांनीं आपल्या अंगावरील कातड्याचे जोडे शिवून भोसल्यांच्या चरणीं घातले तरी फिटायचे नाहींत इतके चिटणिसांवर छत्रपतींचे उपकार आहेत ! मग अशा प्राणांतिक संकटांत खंडूजीनें धन्यासाठीं नको का उडी घ्यायला ?

**संभाजी**:—नको घ्यायला ! खंडूजी, शंभुराजांसाठीं मराठ्यांनीं आतां

कोणताही शीण नको घ्यायला ! मायेच्या मराठ्यांनीं शंभुराजांचे, इतके अपराध पोटांत घातले आहेत, कीं प्रत्यक्ष आबासाहेबांना घालवले नाहींत! किती काळ मराठ्यांच्या राजभक्तीचा अंत पाहावा ? जा बेटा, आलास तसा सुखरूप रायगडीं जा. मराठ्यांच्या स्वामिभक्तीची कसोटी घ्यायला कळी-काळानें नुक्ता कुठें प्रारंभ केला आहे. मराठेशाहीवर आजच्याहूनही दारुण संकटपरंपरा कोसळायची आहे. कळकळीनें सांगतों; ह्या नालायक राजासाठीं आयुष्याची माती करून घेऊं नकोस. सुखानें रायगडीं जा. राजारामराजांना सांग; म्हणावें, तुम्हींच आतां दौलतीचे धनी. मराठे-शाहीचा संसार शंभुराजांनीं मोडकळीस आणला तो सांवरण्याचा बोजा आतां तुम्हां शिरीं! गडावर सिंहासनाच्या मुजऱ्याला जातांना खंडूजी, शंभुराजांच्या नांवाचीं पांच फुलें अधिक घेऊन जात जा. आबासाहेबांच्या समाधीला नमस्कार करतांना—त्यांच्या ह्या कुपुत्राचे शतशः प्रणिपात—पोहों-चीव. छोटे सरकारना-चिमुकल्या बाळराजांना-आमचा विसर पडेल असें करा, आणि राणीसाहेबांना म्हणावें—काय सांगूं ? कोणते शब्द उच्चारूं ? राणी-साहेबांना सांगावें असें काय उरलें आहे ?—म्हणावें, औरंगजेबानें महाराजांनाच मुसलमान बनवून मराठेशाहीलाच नव्हे तर हिंदुधर्माला हलविण्याचा घाट घातला आहे. लवकरच शंभुराजांच्या सुटकेची भयंकर वार्ता आपणांला ऐकावी लागेल !

खंडूजीः—राजा, राजा ! काय बरळलास ? कसलें विष ओकलास हें ! कुण्या पातक्याची तुला दृष्ट झाली, कीं एखाद्या अघोरपंथ्यानें तुझ्यावर कसली करणी केली ? राजा, ही निरवानिरव कसली मांडली आहेस ?

संभाजीः—मरणकाळची ! खंडूजी, ही मरणकाळची निरवानिरव आहे. जगण्यासारखें जवळ कांहीं उरलें नाहीं म्हणून मरण पत्करायचा तुझ्या धन्याचा निर्धार झाला आहे !

खंडूजीः—नका ! मायबाप, असा त्रागा करूं नका! असें अशुभ चिंतूं नका ! आधींच राजांच्या नुसत्या कैद होण्यानें रायगडीं हाहाःकार उडाला असेल. राजस्त्रियांनीं धाय मोकलून धरणीवर गडबडा लोळण घेतली असेल. आबालवृद्ध मावळ्यांना भुतानें घेरल्यागत वेडीपिसी अवस्था झाली

असेल! हत्ती आरोळ्या फोडीत असतील! घोड्यांनीं तोंड लावलें नसेल चाऱ्याला, अशांत आणि राजांनीं आपणहून असें मरण—नको, नको! त्या अनिष्टाचा स्पर्श नको जिभेला! देव राजांना उदंड आयुष्य देईल! धनी, शिर्क्यांशीं एकी करून, शहाजादी झिबुन्निसाबाईची मर्जी धरून गुप्तपणें आपल्या सुटकेचा खंडूजीनें इलाज मांडला आहे. शिवाय औरंगजेबापुढें राजांची चौकशी होऊन सजा फर्मावली जायला अद्याप चारपांच दिवसांचा अवकाश आहे तोंवर मराठी फौजा आणून मारूं कीं मरूं; असा रात्रीच्या काळोखांत अवचित गनिमी हल्ला चढवून राजांची सुटका करूं अशी चाकराला उमेद आहे हुजूर.

**संभाजीः**—काय गनिमी हल्ल्यानें आमच्या सुटकेचा यत्न करणार तूं? धर्मासाठीं मरण पत्करायची वैऱ्यांनीं अनायासें संधि दिली असतां शरमिंधागत आम्हांला रायगडीं नेणार तूं? नको; खंडूजी, नालायकीच्या लांच्छनानें काळवंडलेल्या शंभुराजांची स्वकीयांसमोर आतां धिंड काढूं नकोस. अष्टप्रधानांची मर्जी मोडून दिमाखानें दौलतीवर आलेल्या ह्या संभाजीवर मावळमराठ्यांना काळें तोंड दाखवण्याचा वखोत आणूं नको. आतां आमच्या मानी तब्येतीला शोभेसा आमचा शेवट कशानें होणार असेल, अवघी उमर दुर्लौकिकांत गमावलेल्या तुझ्या ह्या धाडशी धन्याला मरतां मरतां जरासा चांगुलपणा जर कोणत्या दिव्यानें लाभणार असेल तर तो आतां एका मरणानेंच! औरंगजेब बादशहा आम्हाला मरणाची दहशत घालून हिंदूचे मुसलमान बनवूं पहात आहे. तेव्हां हिंदुपदपादशहाला मरणापेक्षांही स्वधर्म प्यारा आहे, हे बादशहाच्या अनुभवाला आणून देण्यानेंच आमच्या आयुष्याचा शेवट आतां गोड होणार आहे.

**खंडूजीः**—धनी, स्वधर्माभिमानानें मरण पत्करून आपल्या आयुष्याचा शेवट गोड होईल खरा; पण यावच्चंद्रदिवाकरौ हिंदुधर्माचें संरक्षण व्हावें म्हणून आबासाहेबांनीं स्थापलेल्या हिंदुपदपादशाहीची काय वाट? फौजेंत बाजारबुणगा भरलेला, कलुषानें खजिन्याची उधळपट्टी करून टाकलेली; बालराजे लहान, राजाराममहाराजांचा आजवर कैदेत कोंडमारा झालेला, स्वाऱ्याशिकाऱ्यांची दगदग त्यांना ठावी नाहीं. कर्ते कर्ते

मोहोरे मारले गेलेले, कोणी घरोघर बसलेले; धनीसाहेब, आपल्यापायींच मराठेशाहीला अशी पोरकी अवस्था आली असेंच ना ?

**संभाजीः**—होय खंडूजी ! आम्हीच ह्या बेबंदशाहीला कारण झालों.

**खंडूजीः**—मग धनीसाहेब, अशा निराधार अवस्थेंत आपल्यासारख्या रणझुजारांना मराठेशाही मुकली तर दौलत उद्यां कोणत्या दुर्गतीला जाईल ह्याची कल्पना करा ! हा धर्मवेडा अलमगीर उद्यां आमच्या मातृभूमींत दिल चाहेसा हैदोस मांडील, अनन्वित जुलुमानें मराठ्यांना त्राहि भगवन् करून सोडील, जुल्म जबरदस्तीनें सनातन हिंदुधर्मीयांना बाटवून मुसलमान बनवील ! पवित्र देवालयांच्या मशिदी बनवील ! देवांच्या मूर्तींच्या जागीं अवलीयाचें कबरस्थान रचील ! नको, राजा, अभद्र मरणाला कवटाळून स्वराष्ट्राला मारूं नको ! रयत लेंकरागत तुला ! लेंकरां-साठीं तरी असा आतताई बनूं नको.

**संभाजीः**—बरोबर आहे. खंडोबा, एकापरी तुझें पांडित्य सूर्यप्रकाशा-इतकें सत्य आहे. आणि ह्या बंदिवासांतून मुक्तता झाली तर आमच्या हातांनीं राजाराममहाराजांची दौलतीवर स्थापना करून आमच्या पातकांचें आम्ही क्षालन करूं; पण ह्या बंदिवासानें आम्ही जिवंतपणींच मेल्या-सारखें झालों आहों. ह्या मढ्या जिण्याला तुझ्या करामतीनें सुटकेचा जिवंत-पणा लाभेलच असा तरी काय भरंवसा ?

**खंडूजीः**—हुजूर, यशापयश, जयापजय ह्या दैवाधीन गोष्टी असल्या तरी मानवी यत्नांत कसूर होतां कामा नये. यशदात्री भोंसल्यांची पाठी-राखी मायभवानी समर्थ आहे. हुजुरांनीं तेवढा एकदां आशीर्वाद द्यावा.

**संभाजीः**—ठीक आहे. मायभवानी तुला यश देवो ! जा बेटा, इथें आतां अधिक रेंगाळणें धोक्याचें आहे.

**खंडूजीः**—येतों तर धनी. [ जातो.

**संभाजीः**—मायभवानी यश देवो ! खंडूजी, ह्या पातक्याजवळ तूं आशीर्वाद मागितलास आणि आम्हींही तो दिला खरा; पण मुखांतून आशीर्वादाचे बोल निघत असतां आमचें अंतर्याम आम्हांला ग्वाही देत होतें कीं, पातक्या ! हवेतल्या बुडबुड्याहून तुझ्या वाणीला अधिक काय

किंमत असणार! बेटा, इतका मात्र भरंवसा वाटतो, कीं आमचा आशीर्वाद फळाला येवो वा न येवो; हा संभाजी तरो वा मरो! खंडजी, तुझ्यासारखे स्वामिभक्त ज्या राष्ट्राला लाभले आहेत, संताजी–धनाजीसारखे लढवय्ये ज्या मराठेशाहींत अजून बाकी आहेत; प्रल्हाद निराजी, रामचंद्रपंतासारखे मुत्सद्दी जोंवर स्वराज्याची धुरा वहायला समर्थ आहेत तोंवर हिंदुपदपादशाहीचा उत्कर्ष आणि उत्कर्षच झाल्यावांचून राहणार नाहीं खंडोजी, ह्या संभाजीला सजा फर्मावली जायला चार पांच दिवसांचा अवधी असला तरी न जाणो, आधींच आमचें दुर्दैव ओढवलें. तर–[ पडद्यांत–दगा, दगा, दौडो, पकडो, काफर को काटो.] अरेरे, हा ओरडा कसला! खंडूजीला तर कोणीं ओळखला नाहीं ना? [ मुकर्रबखान येतो.

मुकर्रबः—राजाजी, अबी यहां पर कौन आयाथा? आपकू खाना किसनें खिलवाया? जबान क्यंव नहीं खोलते. बोलो! क्या, हमसे आप गुफ्तगूं नहीं करना चाहते? कुच पर्वा नहीं! यहांपर कौन आयाथा और किस मतलबसे आयाथा, यह सब बातें हमे कब्जीनें ठीक ठीक बतलाई हैं. यहांसे निकलतेही फराशीके भेसमें आया हुवा खंडो बल्लाळको पहिलेवर के राहुटीमेंसे कब्जीनें झट् पैछाना है!

संभाजीः—काय? अजूनही तो राहू आम्हाला ग्रासतोच आहे का? आतां संभाजीचा तर शेवट ठरलाच; पण परमेश्वरा! माझ्या खंडोबाला तरी रायगडीं सुखरूप जाऊं दे.

मुकर्रबः—राजाजी, ऐसे बुरी तरकीबसे छूट जानेका बेफायदा खियाल अब मत् करो. ये गफ्लतमें आपने कुच कमाया तो नहीं, लेकीन पांच छे रोजके बाद आनेवाली मौत खुद् अपने हातसे आज ला ली समजो. कौन है पहेरेपर [ एक पठाण येतो.] शायद इतनेमें बादशहाका सवारी हो जायेगी. होश हवाससे पहेरेपे खडे रहनेको बोल दो सबको. और ओ काफीर खंडोबल्लाळके पीछे भेजे हुवे पठान वापीस लौटतेही हमारे सामने दाखल करो. [ पडद्यांत ललकाऱ्या ओरडतो.] ए देखो, बादशहाकी सवारी हो गई. दौडो. [ पहारेकरी जातो. औरंगजेब, मागून एक काजी व कांहीं अरब येतात.]

औरंगजेबः—अये खुदा! क्या यही शिवाजीका समशेरजंग शहाजादा संभाजी?

मुकर्रबः—जी हां खाविंद.

औरंगजेबः—वाहवा! दिमाखसे बेदरकार, हिम्मतका शेर, दिखाईमें खबसूरत सिपाही! अये परवरदिगार, इतना बहादुर राजा इस्लामी बन जायेगा, तो हम समझते है के तमाम हिंदुस्थानमें एकही तख्त् इस्लामी बननेको कुच अरसा न लगे. क्या, ऐसे भारी शक्सका नमक खाकर वो बदमाष कब्जीनें, इनकोही जहन्नममें मिला दिया? तोबा, तोबा! वैसे सैतानके दोस्तीसे बादशहातको बरकत तो नही आयगी, लेकीन धोका जरूर मिल जायगा. अरब, जाव; इसी वख्त वो बदमाषको काट डालो! राजाजी, राजाजी!

मुकर्रबः—क्या बेगुमान् शक्स् है! जवाबतो देताही नही, लेकीन् सिर्फ् आंखोसें देखताभी नही! राजाजी, खुद् जहां पन्हां पुकार रहे है, होश करो. जरा अदब्से पेश आवो; नही तो मुफ्त् मारे जावोगे.

संभाजीः—पागल, चाकरीच्या तुकड्यानें शरमिंदे बनलेल्या तुम्हीं कुत्र्यांनीं गोंडा घोळून त्याची मर्जी धरावी. गैरसावधपणानें सांपळ्यांत सांपडला, म्हणून वाघाला जातकुळीचा विसर पडत नसतो.

औरंगजेबः—बेशक, बेशक बहादर! गोली लगनेपरभी जातका शेर जैसा गोली चलानेवालेपरही हमला करता है, वैसाही असली जात के सिपाही का दिमाख रहता है! राजाजी, आपके यही दिमाख्पर ये अलम गीर कुरबान है! राजाजी, ओ बदमाष कब्जीनें आपको इस हालतमें लाया. लेकिन् खैर; हुवासोहुवा. दिलमें फिक्र मत करो. क्योंके शायद इस हालतमें सेहि अल्लाहो-तआला आपको बडे नवाब बना देगा.

संभाजीः—अस्सें? आणि हें बादशहांनीं कसें जाणलें!

औरंगजेबः—राजाजी, सिर्फ य बादशहाकोही नहीं तो आलम दुनियाको मषहूर है के सच्चा धरमको माननेवाले शक्स्को खुदा-तआला कबीभी बूरी हालत में नही रखता. राजाजी, यह अलमगीर बादशहा वही पैगं-बरका–दुनियाको सच्चा धरम बतलानेवाला समझता है. और इसलियेही